# प्रस्तावना.

येनात्माऽबुध्यतात्मैव परत्वेनैव चापरम् ।
अक्षयानन्तबोधाय तस्मै सिद्धात्मने नमः ॥

भावार्थ— ज्यानें आत्मा हाच आत्मत्वें करून जाणला व आत्म्याहून इतर सर्व वस्तु अनात्मेंकरून जाणल्या अशा अविनाशी अपरिमित ज्ञानस्वरूप असलेल्या स्वयंसिद्धात्म्याला मी नमस्कार करितों.

प्रिय बंधूनों! ही गोष्ट आपणांस पूर्णपणें अवगत आहे कीं; श्रीमत् स्वामी कुंदकुंदाचार्यांनीं समयसारासारख्या ग्रंथराजाची रचना करून जैन समाजावर अप्रतिम उपकार करून ठेवले आहेत. ज्याप्रमाणें जैन समाज स्वामी कुंदकुंदाचार्यांचा उपकृत आहे, त्याप्रमाणेंच ज्यांनीं समयसार ग्रंथराजाची सरळ सुबोध संस्कृत पद्यात्मक कलशा करून आत्मख्याति नामक संस्कृत टीका केली अशा श्रीमत् स्वामी अमृतचंद्राचार्यांचाही ऋणी आहे; आणि त्यावरही पंडित राजमल्लजींनीं बालबोधिनी टीका व पंडित बनारसीदासजींनीं छंदोबद्ध रचना केली नसती तर आज आम्हां सर्व साधारण जनतेला उपरोक्त ग्रंथराजाची ओळख पण झाली नसती. तेव्हां विद्वद्रत्न पंडितद्वयांचे आभार मानल्याशिवाय कसें रहावेल. असें जरी आहे तरी अद्यापही आमचा समाज खऱ्या तत्वज्ञानापासून अतीव दूर आहे.

खरें स्वरूप कसें ओळखावें तें दाखविणारा-खरा खरा अनुभविक वाटाड्या हवा. आणि हें काम सद्गुरूशिवाय इतरांना साधणार नाहीं, हें जाणूनच व आत्मख्यातीसारखे कठीण ग्रंथ आम्हां अल्पज्ञानीला समजणार नाहींत, म्हणूनच सर्व अध्यात्मग्रंथाचा सार श्री १०५ क्षुल्लक ब्र० धर्मदासजी यांनीं "सम्यग्ज्ञानदीपिका" नामक ग्रंथ हिंदी भाषेंत मुमुक्षुजनाकरितां करून अध्यात्माचा अति दुर्गम मार्ग अति सुगम करून सोडला आहे. हे आम्हां अल्प मतीवर त्यांचे अत्यंत उपकार झाले आहेत. त्यांच्या उपकृतींतून उतराई होण्याकरितां व स्वतःस स्वस्वरूपाची प्राप्ति व्हावी आणि महाराष्ट्रभाषेंत असें ग्रंथ मुळींच नाहींत म्हणून नातेपुते निवासी श्रीमान् मेथा धनजी जयचंद यांच्या प्रेमानुरोधामुळें या "सम्यग्ज्ञानदीपिकेचे" भाषानुवाद करण्याचे कबूल केलें. वास्तविक अशा महत्वाच्या कार्यास मी पूर्णपणें असमर्थ असतांना शेठसाहेबांनीं तें माझ्यावर सोपविलें व मला अध्यात्मशास्त्रांत प्रवेश करण्यास भाग पाडलें, त्यामुळें मी त्यांचा फार आभारी आहे. तसेंच श्रीमान् विद्वद्रत्न सिद्धांतशास्त्री पं. फूलचंदजी यांनीं वारंवार प्रोत्साहन दिल्यामुळें त्यांचा व माझे बालमित्र श्री. गांधी भाईचंद नेमचंद फोंडसिरसकर (नातेपुते) व चि. गुणपाल दादा कत्ते यांनींही हें पुस्तक छापण्याचे कामीं

मदत केली असल्यामुळें यांचाही मी फार आभारी—

आपला,

अमीचंद सखाराम शहा.

## प्रकाशकाचे दोन शब्द

पूज्य माता गंगाबाई व धर्मपत्नी चतुरबाई यांच्या वियोगानिमित्त कांहीं दान करण्याचा विचार केला होता, परंतु तो संकल्पमात्रच राहिला होता. परंतु श्री १०८ आचार्य शांतिसागर महाराजांचे परमशिष्य श्री १०८ मुनि कुंथुसागर महाराजांनीं मला सम्यग्ज्ञानदीपिकेचें मराठी भाषेंत प्रकाशन केल्यानें महाराष्ट्रांतील लोकांना फायदेशीर होईल. असा उपदेश दिला होता. व या उपदेशावरून माझी इच्छा या ग्रंथाचें प्रकाशन करण्याची झाली.

म्हणून माझी पूज्य मातोश्री गंगाबाई व धर्मपत्नी चतुरबाई यांच्या ज्ञानावरणीयकर्मक्षयार्थ व स्वोपकारार्थ या ग्रंथाचें प्रकाशन केलें. आशा आहे कीं, स्वाध्यायप्रेमी याचा लाभ घेतील.

### आभार

प्रो० अमीचंद सखाराम शहा (शांतिकुटीर) येवती यांनीं हिंदीचें मराठी भाषेंत अनुवाद करून जें महत्वपूर्ण कार्य केलें आहे त्याबद्दल मी त्यांचा कृतज्ञ व आभारी आहे.

आपला,

मेथा धनजी जयचंद

# भूमिका.

आम्हीं, तुम्हीं, हा, तो, हे चार शब्द आहेत त्याचे पुर्वी जो कोणी आहे तीच अखंडित, अविनाशी, अचल, स्वस्वरूप-स्वानुभवगम्यसम्यग्ज्ञानमयी स्वभाव वस्तूच भूमिका आहे.

वर्तुलाकार असलेल्या लक्षयोजन जंबूद्वीपाच्या भूमिकेंत जर एखादा अणूरेणू अथवा मोहरी पडलीं तर जसे अल्पदृष्टि माणसाला ती कोठे व कशी पडली हे सांगणें अंत्यत कठीण तसेच ह्या ३४३ तीनशेंत्रेचाळीस राजू प्रमाण असलेला त्रिलोक पुरुषाकार आहे नंतर अलोकाश आहे त्या अलोकाकाशांत हा त्रिलोक ( ब्रम्हांड ) आहे परंतु असें अनंत ब्रह्मांड आणखी असतेतर त्या अलोकाकाशांत अणुरेणू प्रमाणें किंवा मोहरी प्रमाणें दिसते. असा हा अफाट लोकालोक किंवा अनंत त्रिलोक ( ब्रह्मांडें ) त्या स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञानमयी भूमिकेंत अणूरेणू प्रमाणें भासते ;

सूर्याचा प्रकाश जसा सर्व पृथ्वीवर ( एकक्षेत्रावगाही ) पसरतो त्यामध्यें जसी राई ( मोहरी ) विकारी दृष्टीवाला पाहूं शकत नाहीं ( दिसत नाहीं ) तसेंच सम्यग्ज्ञानमयी सूर्यप्रकाशांत हा संपूर्ण लोकालोक अणुरेणूप्रमाणें किंवा राई-प्रमाणें दिसतो. अर्थात् ३४३ राजू प्रमाण असलेला हा अफाट असा लोकालोक ज्ञानामध्यें अगदीं एक अणूप्रमाणें आहे.

हे सज्जन मित्रांनो! जसा सूर्यप्रकाश पृथ्वीवर एकक्षेत्रावगाही आहे, परंतु तद्रूप होत नाहीं, तसें हा लोकालोक ज्ञानमयी स्वभावभूमिकेंत आहे. परंतु त्याशीं तो तन्मय होत नाहीं. त्याचप्रमाणें मी, तूं, हा, व तो हे चार शब्द आहेत त्याशीं पण तन्मयी नाहीं. अर्थात् ज्ञानस्वरूपी आत्मा ह्या सर्वांपासून अगदीं भिन्न आहे.

ह्यांत प्रथम मिथ्याभ्रमजालरूपी संसाराचा व आपला कसा संबंध आहे हें जाणण्याकरितां ही भूमिका मन लावून वाचा. नंतर चित्रद्वार पहा व त्याचा खुलासा वाचा. परंतु द्वारालाच आपला स्वभाव समजूं नका.

नंतर स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञानमयी स्वभावसूर्यांत जसा स्वभावतःच तर्क वितर्क किंवा संकल्प विकल्प नाहीं ही गोष्ट हस्तांगुलीच्या चित्रानें सूचित केली आहे

चवथें ज्ञानावर्णीचित्र आहे. त्याचा असा विचार करावा कीं, जसें सूर्यापुढें आपोआप मेघपटल आडवे येतात जातात तसेंच सम्यग्ज्ञानमयी सूर्यापुढें मति, श्रुति, अवधि, मनःपर्यय आदि पौद्गलिक वस्तू येतात जातात तरी जसें मेघपटलांनी सूर्याचें कांहीं एक नफानुकसान न होतां तो जशाचातसाच स्वयं सिद्ध आहे. तसेंच सम्यग्ज्ञानसूर्यापुढें ज्ञेयरूप पौद्गलिक वस्तू आल्या किंवा गेल्या तरी त्या ज्ञानसूर्यास कांहीं एक धोका नाहीं.

पांचवाप्रकार दर्शनावर्णीकर्माचा आहे, आपणामध्यें पहा-
ण्याची शक्ति आहे परंतु दर्शनावर्णी कर्म पाहूं देत नाहीं
सहावाप्रकार वेदनीयकर्माचा आहे. त्याचे दोन भेद आहेत
१ सातावेदनीय २ असातावेदनीय. एकानें स्वर्गादिसुख
मिळतें व दुसऱ्यानें दुःख प्राप्त होतें.

सातवा प्रकार मोहनीय कर्माचा आहे. जें कर्म मोहून
टाकतें म्हणजे हिताहिताचें ज्ञान होऊं देत नाहीं तें मोहनीय
कर्म होय. "नाटकांत जसा सूत्रधार तसें सर्व कर्मांत
मोहनीय कर्म." ह्याचे मुख्य दोन भेद आहेत. १ दर्शन-
मोह, २ चारित्रमोह. पहिलें जीवाला आत्म्याचें यथार्थ श्रद्धान
होऊं देत नाहीं व दुसरें सम्यक्चारित्र होऊं देत नाहीं.

अष्टमस्थल आयुकर्माचें आहे. जसें अपराधी प्राण्याला
तुरुंगवास भोगावा लागतो, तसेंच ह्या जीवाला चतुर्गतींत
आयुष्य कंठावें लागतें.

नववें स्थल नामकर्माचें आहे. जो स्वभावदृष्टीरहित
आहे तो त्या नामकर्मालाच आपलें स्वस्वरूप समजतो;
परंतु जन्म, मरण नामादिक शरीर धर्म आहेत स्वतःचे
आत्मधर्म नव्हेत.

दशमस्थल गोत्रकर्माचें आहे. कुंभकार ज्याप्रमाणें नाना
तऱ्हेचीं भांडीं घडवितो त्या प्रमाणें गोत्रकर्माच्या उदयानें
लहानमोठ्या उच्च नीच कुलांत जन्म होतो, परंतु तत्वज्ञान-

शून्य जीव स्वतःसच गर्वानें किंवा दीनतेनें उच्च नीच मानतो परंतु स्वभावांत उच्चनीचता मुळींच नाहीं.

अकरावें स्थळ अंतरायकर्माचें आहे. "देणारा देताहे भंडारीका पेट दुःखता है" त्याप्रमाणें जो जीवाला दान देण्यांत, भोग भोगण्यांत, यशकीर्ति कमविण्यांत व खरें आत्मिक सुख भोगण्यांत भंडारी प्रमाणें नेहमीं अडथळा करतो.

याप्रकारें आठी कर्मांचा खेळ सद्गुरूकृपेशिवाय अथवा काललब्धीशिवाय मुळींच संपणार नाहीं "अष्टकर्मरूप गारुड्याची तुमडी बंद करण्यांस भेदज्ञान हीच गुरुकिल्ली आहे."

( ही भूमिका मूळ लेखकाची आहे. )

टीप— क्षु. धर्मदासजींनीं लिहीलेली ही भूमिका या भागांत पूर्ण छापली नाहीं कारण पुढच्या भूमिकेचा संबंध दुसऱ्या भागांशीं आहे. म्हणून बाकीची भूमिका दुसऱ्या भागांत देण्यांत येईल.



श्री १०८ आ० शांतिसागर महाराज



परम तपोनिधि श्री १०८ आचार्य शांतिसागर महाराज
यांचें करकमलीं हें शास्त्र प्रकाशकाकडून गुरु-
भक्तीनें प्रेरित होऊन सादर समर्पित.

# शुद्धि पत्रक

| पृष्ठ | ओळ | अशुद्धि | शुद्धि |
|---|---|---|---|
| ५ | ७ | असतात | असतो |
| ,, | ८ | ,, | असते |
| १५ | १७ | सद्गुरुकृपा हयी | सद्गुरुकृपा हवी |
| १६ | ३ | अंतर मुख | अंतर्मुख |
| १६ | ५ | निधि ध्यास | निदिध्यास |
| ,, | ८ | ,, | ,, |
| ,, | ११ | स्वनुभवगम्य | स्वानुभवगम्य |
| ,, | १४ | देवून | देवूं |
| १७ | १ | स्वस्वरूपस्व- | स्वस्वरूपस्या |
| १७ | ११ | स्मा | स |
| ,, | १४ | [ प्राप्ति ] | [ प्रीति ] |
| १८ | ६ | तर्कवितर्कफाला | तर्कवितर्काला |
| १९ | ८ | म थे | मत थे |
| ,, | ९ | स्वानुभवगम्य | स्वानुभवगम्य |
| ,, | १४ | चिद्भाव | चिद्भाव |
| ,, | १७ | किया | क्रिया |
| २२ | १० | तेहांच | तेव्हांच |
| २४ | १ | नाहा | नाहीं |
| ,, | ३ | विपर्यांशा | विपर्यांचा |
| ,, | ४ | भेदारमा | भेदाला |
| २९ | ६ | ज्ञ नं | ज्ञानं |
| ३० | १० | जाणते | जाणतो |
| ३१ | ६ | सच्चिदानंद | सच्चिदानंदांत |
| ३२ | १७ | पर | पर |
| ३३ | ४ | अन्तरदृष्टी | अन्तर्दृष्टि |
| ३४ | ७ | नाहींच | नाहींच |
| ३४ | १३ | स्पनुभपगन्य | स्वानुभवगम्य |
| ३५ | २ | बहिरदृष्टी | बहिर्दृष्टि |
| ,, | ६ | आत्मज्ञाय | आत्मज्ञाना |

| पृष्ठ | श्लोक | अशुद्धि | शुद्धि |
|---|---|---|---|
| ३९ | ७ | यस्त देशना | यस्तस्य देशना |
| ४० | ३ | मर्थ | मर्थं |
| ,, | ४ | मंत | मंतः |
| ४२ | १ | ज्याच | ज्याचा |
| ४३ | ६ | व्यवरानें | व्यवहारानें |
| ४६ | २ | निश्चदृष्टीनें | निश्चयदृष्टीनें |
| ४७ | ५ | सम्य- ज्ञागना | सम्यग्ज्ञाना |
| ,, | १० | कोणत्याप्रकारें | कोणत्याही प्रकारें |
| ,, | ११ | नाहीं | नाहींत |
| ,, | १३ | वहीदृष्टी | वहिर्दृष्टि |
| ४९ | ११ | अशी | असे |
| ५१ | १ | तर | व |
| ५४ | १५ | तर्मेत | तंमंत |
| ५५ | १५ | असें | अशी |
| ५६ | ११ | येत | येत नाहीं |
| ५८ | ८ | होतरसाता | होत्साता |
| ५८ | ९ | माक्षात | साक्षात् |
| ६० | ४ | लाट | लाठ |
| ६१ | १ | द्रष्टांत | दृष्टांत |
| ६४ | ११ | टंकोकिर्ण | टंकोत्कीर्ण |
| ,, | १२ | देशणालब्धी | देसनालब्धि- |
| ६६ | १४ | सवैया | दोहा |
| ६८ | ११ | नाहीं | नाहींत |
| ७० | १४ | ज्ञनाचा | ज्ञानाचा |
| ७२ | २ | आर त | आरतांत |
| ,, | १६ | नाहीं | नाहींत |
| ,, | १७ | स्वभावतच | स्वभावांतच |
| ,, | ,, | असतां | असतात |
| ७३ | २ | सम्यग्ज्ञामयी | सम्यग्ज्ञानमयी |
| ,, | १२ | जणूं कीं काय | जणूं काय |
| ७५ | १० | रंगे | रंगी |

| पृष्ठ | ओळ | अशुद्धि | शुद्धि |
|---|---|---|---|
| ७६ | ३ | सांरुप | सांख्य |
| ८० | ४ | मेघपर | मेघपटल |
| ,, | ५ | प्रकामान् | प्रकाशमान् |
| ,, | ९ | स्वभाला | स्वभावाला |
| ८२ | ३ | सुर्यप्रकाकाशा- | सूर्यप्रकाशा- |
| ८४ | १० | पौद्गलिक | पौद्गलिक |
| ८७ | २ | काम आहे | काय आहे? |
| ,, | ६ | माणसाला तो | माणसाला. तो |
| ,, | ७ | कसा वाटेल | कसा वाटेल? |
| ८८ | १ | चिकाटीच | चिकाटीचा |
| ८९ | १५ | मासते | भासते |
| ९४ | ५ | गुरु यिन | गुरू विन |
| ९८ | १६ | कर्म एक | कर्म आणि तुम्ही एक |
| ९८ | १७ | [अधार] वेदन | वेदन |
| ,, | १८ | अज्ञान | अज्ञान (अंधार) |
| १०० | ६ | निश्चयव्यवहारदृष्टी | निश्चय, व्यवहारदृष्टि |
| ,, | ७ | अंतर दृष्टी | अंतर्दृष्टि |
| १०२ | १३ | जणे एक | जणे तिन एक |
| ,, | १५ | फागो | फॉयो |
| ११७ | ६ | यंगॅरनीं | यंगॅरना |
| ,, | ११ | करणाराला | कारणाला |
| ११८ | ३ | तुमची | तुपाची |
| ,, | ९ | आणिला | आणील; |
| ११९ | ६ | एका | एक |
| ,, | ७ | ,, | ,, |
| १२६ | ७ | जीवा | जीव |
| १२८ | १४ | तरीएकनाहींतर | आणि |
| १३३ | ५ | पोपटपंचीच | पोपटपंचीच्या |

| | | | |
|---|---|---|---|
| १३९ | १ | नोकम | नोकर्म. |
| १४१ | ८ | समयप्राभृत | समयप्राभृतांत |
| १४२ | १७ | समयप्राभत | समयप्राभृत |
| १४५ | २ | वखून | वसून |

टीप– वरील प्रमाणें शुद्ध करून स्वाध्याय करावा, हे विनंति.

# विषयानुक्रमणिका.



श्रीमान् शेठ मेथा धनजी जयचंद नातेपुतें यांनीं
पू० मातोश्री गंगाबाई व धर्मपत्नी चतुराबाई
यांच्या ज्ञानावरणीयकर्मक्षयार्थ व स्वोप-
कारार्थ या ग्रंथाचें प्रकाशन केलें.



॥ ॐ नमः ॥

# सम्यग्ज्ञानदीपिका.



स्वस्वरूप स्वानुभवरूप इष्टदेवाला नमस्कार सूचक श्लोक.

ग्रंथकर्त्याचें मंगलाचरण.

महावीरं नमस्कृत्य केवलज्ञानभास्करम् ।
सम्यग्ज्ञानसुदीपस्य मया किंचित् प्रकाश्यते ॥

सुंदरी छंद.

"अथ अनादि अनंत जिनेश्वरं, सरससुंदरबोधमयीपरम् ।
परम मंगल दायक है सही, नमत हूं इस कारण शुभमही,,

अनुवादकाराचें मंगलाचरण.

स्वानुभूतिं स्वभावोत्थां निर्विकल्पां निरामयाम् ।
चिन्मयधर्मसंयुक्तां स्तुवे वन्दे च भावतः ॥ १ ॥
धनजीति गृहस्थस्य सद्धर्मस्योपरोधतः ।
सम्यग्ज्ञानप्रदीपस्य भाषान्तरं करोम्यहम् ॥ २ ॥

भावार्थः— नैसर्गिक, निर्विकल्प, रागद्वेषादिपरणती-रहित आणि चैतन्यस्वरूप स्वस्वरूपस्वानुभवगम्य स्वानुभूतीला मी भावपूर्वक नमस्कार करितों. ॥ १ ॥

नातेपुतेनिवासी श्रीमान् शेठ **धनजी जयचंद मेथा** यांच्या प्रेरणेनें आणि आपल्या कर्तव्यामुळें श्री १०५ क्षुल्लक धर्मदासजीकृत " **श्री सम्यग्ज्ञानदीपिका** ,, या ग्रंथाचें मीं ( अमीचंद सखाराम शहा ) भावानुवाद करितों. ॥ २ ॥

## अथ वचनिका

या संसारांत अनादिकालापासून स्वाभाविक वस्तूच दोन प्रकारच्या आहेत. एक जीव, दुसरा अजीव, एक चेतन दुसरें अचेतन, एक ज्ञान दुसरें अज्ञान, ह्या मध्यें दुसऱ्या अजीव, अचेतन, जड किंवा अज्ञानरूप वस्तूचे पांच प्रकार आहेत. पुद्गल, धर्म, अधर्म, आकाश आणि काल. या पांच प्रकारच्या द्रव्यांत फक्त पुद्गलच मूर्तीक व बाकीचे चार अमूर्तीक आहेत. धर्म, अधर्म, आकाश आणि काल हें जसें अमूर्तीक व अचेतन आहेत तसेंच ज्ञानमय, जीव किंवा आत्मा ही अमूर्तीक आहेत परन्तु अमूर्तिकत्व या नात्यानें जरी ( पुद्गलाला सोडून ) बाकी राहिलेलीं चार

अजीव द्रव्यें व पांचवें जीव द्रव्य ह्यांत सामान्यपणें लक्षण एकच दिसतें तरी विशेष लक्षणावरून भेदज्ञान प्राप्त करून घ्यावें; कारण एकाच वस्तूंत सामान्य व विशेष अशीं दोन प्रकारचीं लक्षणें आढळून येतात. जसें:— मनुष्यत्व अथवा पशुत्व. मनुष्यत्व हें स्त्रियां व पुरुष यामध्यें आढळतें परन्तु स्त्रीत्व, हें पुरुषांत व पुरुषत्व हें स्त्रियांत आढळून येत नाहीं. त्याप्रमाणेंच पशुत्व म्हटल्यानें सामान्यतः जनावरांचा बोध होतो परन्तु त्यामध्यें विशेष जे गाय, बैल, म्हैस, शेळी, घोडा, उंट, हत्ती वगैरे यांचें ज्ञान होणार नाहीं. जी वस्तू ज्या ज्या जातीची असेल ती वस्तू त्या त्या जातीच्या विशेष लक्षणांवरूनच जाणली जाते; आणि "जें लक्षण अविनाभावी असतें तेंच विशेषत्व होय." म्हणूनच प्राचीन आचार्यांनीं जीवाचे "उपयोगो लक्षणम्" आणि पुद्गलांचे

"स्पर्शरसगंधवर्णवन्तः पुद्गलाः,, असें लक्षण बांधलें आहे. जीवाचें लक्षण उपयोगमयी आहे म्हणजे जीव ज्ञाता, दृष्टा (पहाणारा, जाणणारा) चेतनस्वरूपी, ज्ञानमय व परमात्मरूप आहे. आणि पुद्गलद्रव्य रूप, रस, गंध आणि वर्ण-धर्मानें सहित आहे. या सहाही द्रव्यांमध्यें पुद्गलद्रव्य इंद्रियगम्य आहे; कारण इंद्रियद्वारें पुद्गलद्रव्याचा बोध होतो परंतु जीव, धर्म, अधर्म, आकाश आणि काल हीं अमूर्तीक द्रव्यें आहेत म्हणून इंद्रियांच्या द्वारें यांचें ग्रहण होऊं शकत नाहीं. म्हणून आगमप्रमाणानें अथवा मानस-प्रत्यक्षानें [ स्वानुभवानें ] यांना ओळखावें. त्यामध्यें विशेषतः जीव हा खरोखर स्वस्वरूप स्वानुभवगम्यच आहे. ज्याप्रमाणें सूर्यांत स्वपर-प्रकाशकत्व गुण किंवा धर्म आहे त्याप्रमाणेंच ज्या वस्तूंत ज्ञान व दर्शन हे गुण स्वाभाविक आहेत ती वस्तू फक्त स्वपरप्रकाशक, ज्ञानघन

जाणावी, आणि ज्यांत स्वभावतःच अज्ञान आहे अर्थात् ज्याचा ज्ञान दर्शन हा धर्मच नाहीं तीच ती अचेतन वस्तू होय. हें तन, मन, वचन शब्दादिक जितके म्हणून शरीराश्रित गुणधर्म आहेत तें सर्व अज्ञान, अचेतन आणि जडरूप आहेत. जसें काजळ आणि काळेपणा अभिन्न असतोस तसें जडत्व व अज्ञानत्व अभिन्न असतोस. शब्द देखील पुद्गलद्रव्याची पर्याय आहे म्हणून जसें ज्ञानघन आत्म्यांत ज्ञानदर्शन गुण आहे तसें शब्दामध्यें सांगण्याचा गुण आहे. ज्ञान ही वस्तू सूर्याप्रमाणें स्वपरप्रकाशक आहे. ती स्वतःच स्वतःला स्वाभाविकपणें जाणतें, आणि आपल्या ज्ञानप्रकाशानें पर वस्तूलाही प्रकाशते तथापि जड, व अज्ञानमय वस्तूंशीं तन्मय होऊन प्रकाशीत नसते.

उदाहरणः— सांगण्याचा धर्म जड शब्दांत

आहे, तो शब्द जरी जड आहे तरी स्वपर वस्तूचें शाब्दिक वर्णन करूं शकतो परन्तु स्वपर वस्तूंला मात्र जाणूं शकत नाहीं. कारण शब्द स्वतः शब्दमयी स्वरूपांतच तन्मय होऊनच वर्णन करूं शकतो. आणि जर तो आपला स्वभाव सोडून अन्य वस्तूचे गुणधर्मांशीं तन्मय होऊन वर्णन करतो असें म्हणावें तर स्वभावसंकर झाल्याकारणानें कोणतीही वस्तु कोणत्याही स्वतंत्र गुणधर्मानें सहित राहूं शकत नाहीं; परन्तु ज्या वस्तूंचे जे गुणधर्म असतात ती वस्तु त्या गुणधर्माला केव्हांही सोडीत नाहीं. असा हा नियम त्रिकाल बाधित आहे त्याकाणानें स्वस्वरूप स्वानुभव गम्य सम्यक्ज्ञानमयी वस्तूं आणि शब्दात्मक अज्ञानमयी [ जड ] वस्तु या दोहींमध्यें स्वाभावतःच सूर्य आणि अंधाराप्रमाणें भेद आहे तरी शब्द आहे तो परमात्म्याचें ज्ञानमयी वर्णन

करूं शकतो परन्तु त्याला केव्हांही जाणूं शकत नाहीं.

प्रश्न-- शब्द तर अज्ञान वस्तु आहे. सम्यग्ज्ञानमयी परमात्म्याला जाणूं शकत नाहीं. तेव्हां ती जड, अज्ञान वस्तु परमात्म्याचें वर्णन कशीं करूं शकते ?

उत्तर—जसें चंद्राचें ज्ञान नसणाऱ्या कोणी-एकानें आपल्या गुरूला अत्यंत नम्रतापूर्वक विचारलें कीं, हे स्वामिन् ! चंद्र कोठें व कसा आहे ? तेव्हां स्वामींनीं अत्यंत जिज्ञासू जाणून "हा पहा तो माझ्या बोटावर आहे.,, असे सांगितलें आतां येथें विचार करा कीं, '**हा पहा तो माझ्या बोटावर आहे**' या शब्दांत व त्या चंद्रांत जितका भेद आहे तितकाच भेद सम्यग्ज्ञानमयी परमात्म्यांत आणि शब्दानें वर्णन केलेल्या परमात्म्याचें स्वरूपांत आहे. याप्रकारें अज्ञानमयी शब्द देखील परमात्म्याचें वर्णन करूं शकतो.

जास्त काय सांगावें! ज्या शब्दानें ज्ञानरूप आत्म्याचें वर्णन केलें जातें त्या शब्दालाही तो ज्ञानघन आत्माच जाणतो, म्हणून परमात्म्याच्या स्वरूप वर्णन करणाऱ्याही शब्दाच्या अपेक्षेनें मुख्यता परमात्म्यालाच आहे.

जसें एका शहरांत अज्ञानी राजा आहे. त्याच्यावर ज्ञानी राजा राज्य चालवूं शकतो, परंतु उलट ज्ञानी राजावर अज्ञानी राजा राज्य चालवूं शकत नाहीं; तसें सहज स्वभाव-सम्यग्ज्ञानाशिवाय मोठा कोणीच नाहीं. म्हणून आपण त्याची अशी स्तुति करूं शकतो. "हे केवलज्ञानरूप सूर्या! तूं स्वभावतःच जसा होता तसाच व सध्यां जशाचा तसाच आहेस व पुढें तसाच केवलज्ञानमयी सूर्यच रहाशील. तुझें रूप टंकोत्कीर्ण त्रिकालाबाधित आहे." जसें सूर्यापुढें मेघपटल किंवा वीज आडवी येवो अथवा जावो, परंतु सूर्य

जसा अचल, टंकोत्कीर्ण, जशाचा तसा व कांहींएक न्यूनाधिक न होतां स्वपरप्रकाशकच राहतो. तसें हा आत्मा उपाधिपासून भिन्न राहतो म्हणून हे ज्ञानसूर्या! तूं तुझ्या पुढें आडवे येणाऱ्या भ्रम ( मोह, व संकल्पविकल्पात्मक रागद्वेष ) वगैरे व पापपुण्यस्वरूप पुद्गल विकाराला मेघपटलाप्रमाणें वेगळे ( भिन्न ) समज! कारण तूं स्वतः ज्ञानघन परमात्मा आहेस आणि हे पुद्गलविकार ज्ञानशून्य, जडरूप ज्ञेयपदार्थ आहेत. याप्रमाणें जर अंतर्मुख होऊन स्वपरभेदज्ञानानुभव करणार नाहींस तर तुला तुझाच घात केल्याचें पातक लागेल. "आत्मघातकी, विश्वघातकी" याप्रमाणें लोकांत प्रसिद्ध उक्ती आहे. आत्मघातकी प्राण्याच्या आत्मोन्नतीचा मार्गच बंद पडतो, म्हणूनच सांसारिक सुखदुःखानें आकुलित होतो.

प्रश्न— हे स्वामिन् ! यद्यपि मी खात्रीपूर्वक केवलज्ञानमयी आहे आणि तन, मन, धन, वचनादिकांपासून सूर्य व अंधःकाराप्रमाणें अत्यंत भिन्न आहे तथापि " मी केवलज्ञान-मयी सूर्य आहे " हें मला कसें समजेल तें सांगा ?

उत्तर-- समयप्राभृत ग्रंथांत श्रीमत् कुंद-कुंदाचार्यांनीं प्रारंभींच असें सांगितलें आहे कीं, जीवद्वार, अजीवद्वार, आश्रवद्वार, संवरद्वार, निर्जराद्वार, बंधद्वार, मोक्षद्वार, पापद्वार, पुण्य द्वार, सर्वविशुद्धिद्वार, कर्ताद्वार व कर्मद्वार ह्या बारा द्वारानें तूं तुला खात्रीपूर्वक जाण. आम्ही तुम्ही, तो, हा, ह्या चारींच्या योगानें तूं तुझा निश्चय कर. अथवा तन, मन, धन, वचना-दिकांच्या द्वारें तूं तुझी ओळख पटवून घे. तसेंच मूर्तिक पुद्गल आणि अमूर्तिक असें जे धर्म, अधर्म, आकाश आणि काल ह्या पांचहीं

द्रव्यांच्या निमित्तानें तूं तुझी ओळख करून घे. अथवा आहे आणि नाहीं या दोन शब्दांच्या योगानें तूं तुला जाण. वस्तूचें स्वरूप जाणण्याचे जे दोन मार्ग व्यवहार आणि निश्चय त्यांच्या योगानें तूं स्वतः-ला ओळख. नाम, स्थपना, द्रव्य आणि भाव ह्या चारींच्या योगानें तूं तुझा बोध प्राप्त करून घे. किंवा जन्म, मरण, सुख, दुःख व शुभाशुभ विचार यांच्या द्वारें तूं तुला समज. अथवा संकल्पविकल्पात्मक जें मन, त्याचें धर्म, राग-द्वेष माझे आहेत किंवा माझे नव्हेत असें जें भावकर्म, द्रव्यकर्म व नोकर्म यांच्या द्वारें आणि वेद, पुराण, व सिद्धांतशास्त्र यांच्या द्वारें तूं तुझी ओळख करून घे; म्हणजे उपरोक्त जीव द्वारापासून येथपर्यंत जे ज्ञेय पदार्थ आहेत, आणि त्याशिवाय आणखीहि जे जे ज्ञेयपदार्थ आहेत, त्यांना जो जाणतो तोच 'तूं', असें

निश्चयात्मक समज. व याप्रमाणें उपरोक्त द्वारानें जाणण्यापेक्षां " **स्वानुभव होण्याचा खरा मार्ग म्हणजे स्वस्वरूप स्वानंदनिमग्न सद्गुरूचें वचन होय.** ,,

याप्रमाणें आत्म्याला जाणण्याचें साधन जें जीवद्वार वगैरे त्यांना आपल्याहून जर अभिन्न समजशील तर तुझें असें समजणें अज्ञानमूलक होईल आणि यामुळें तूं मिथ्यादृष्टि होशील.

जसें एखाद्या इष्ट स्थळीं पोहोंचण्याकरितां पुष्कळसे मार्ग असतात परंतु जो कोणी त्या इष्ट स्थळाचा इच्छुक त्या मार्गालाच जर आपलें इष्ट स्थळ मानेल तर तें त्याचें मानणें जसें मिथ्या [खोटें] ठरेल त्याप्रमाणेंच जो कोणी वर सांगितलेल्या द्वाराला व स्वस्वरूप-स्वानुभवगम्य सम्यग्ज्ञानमयी परमात्म्याला अग्निउष्णतेप्रमाणें किंवा सूर्यप्रकाशाप्रमाणें एक मानेल तो मिथ्या-दृष्टी महापातकी होईल.

" उपरोक्त द्वारानें तूं स्वतःला जाण. ,, असें म्हटल्यानें असें समजूं नकोस कीं, हे जीव-द्वार वगैरेच चेतन अर्थात ज्ञानदर्शन स्वभाव आहेत. यद्यपि अज्ञानाच्या निमित्तानें हे जीव-द्वार वगैरे आत्म्याहून अभिन्न आहेत असा बोध होतो; परन्तु वस्तुतः ते आत्म्याहून भिन्न जडमयी आहेत कारण हे कर्माच्या निमित्तानें होतात. यद्यपि ज्ञान स्वयं यांना जाणतें तरी देखील " या द्वारांच्या योगें तूं स्वतःला ओळख ,, असें बोलण्याचा व्यवहार अथवा परिपाटी आहे; आणि व्यवहारदृष्टीनें ती परि-पाटी वास्तविक आहे. कारण जरी ज्ञेयाला ज्ञान जाणतें तरी ज्ञेयाच्या अस्तित्वानेंच ज्ञानाचें अस्तित्व सिद्ध होतें. ज्ञान आणि ज्ञेय हीं दोन आपेक्षिक तत्वें आहेत. या कारितां ज्ञेयाच्या निमित्तानें ज्ञानाचें अस्तित्व सिद्ध होतें. ही गोष्ट निर्विवाद आहे. " जर

ज्ञेय नसेल तर ज्ञान कोणाला जाणेल? ,, याप्रमाणें जीवद्वार वगैरे ज्ञानघन आत्म्याहून वेगळे आहेत, ज्ञानमय आत्म्याला जाणण्याचीं हीं साधनें आहेत; परन्तु स्वयं ज्ञानघन होऊं शकत नाहीं. यांच्या द्वारें तूं स्वतःला जाण. हा केवळ एक व्यवहार आहे.

जे गुणधर्म ज्या वस्तूंत स्वभावतः मुळींच नसतात किंवा एकाचे निमित्तानें होणारे गुण-धर्म एकावर जबरदस्तीनें टाकण्याची जी भाषा तिला व्यवहार असें म्हणतात. ,, परंतु चाणाक्ष मनुष्य या व्यवहारापासून देखील आपली इष्टसिद्धि करून घेतो. जसें राजद्वार असें म्हटल्यानें काय बोध होतो कीं, राजा येण्याजाण्याचें जें द्वार तें राजद्वार. परन्तु असें कोणी समजत नाहीं कीं, राजा आहे तोच द्वार आहे. त्याचप्रमाणें तुपाची घागर, रोकड खोली, देवघर, अंगांत कपडा घालणें,

पाणी गरम करणें वगैरे ही सर्व भाषा व्यवहारीकच आहे. आणि या भाषेच्या द्वारें सर्व व्यवहार पण सुरळीत चालतो. परन्तु वस्तुस्थिति या व्यवहाराहून भिन्न आहे. त्याप्रमाणेंच वस्तू निरूपणांतही जर कांहीं ठिकाणीं अशी भाषा वापरली जाते. त्यावेळीं लक्ष्यलक्षण भेदांवरून वस्तूचें स्वरूप ओळखून घ्यावें. शब्दाच्या निमित्तानें वस्तूचें स्वरूप समजणें हें आपल्या प्रज्ञेचें काम आहे. ज्यामध्यें स्वयं बुद्धि नाहीं त्याचें शास्त्र काय करूं शकते? "यस्य नास्ति स्वयं प्रज्ञा तस्य शास्त्रं करोति किम् ", म्हणून भाषेच्या निमित्तानें ज्या वेळीं जो अर्थ घ्यावयाचा असेल त्यावेळीं तोच घ्यावा नाहींतर सर्वत्र घोंटाळा माजून दिशाभूल होण्याचा फार संभव आहे म्हणून कोणत्या गोष्टींत प्रथमतः योग्यता पाहिजे, नंतर वेदपुराणश्रुति किंवा सद्गुरुकृपा हवी. जसें सूर्याला पाहून

सूर्यज्ञान होतें तसेच बाह्य वस्तूंकडे धावणाऱ्या बहिरात्म्याला [ बाह्य संकल्प विकल्पात्मक मनाला ] अंतर् मुख होऊन आगम प्रमाण किंवा सद्गुरु वचनानुसार आपल्या स्वतःकडे पाहील, मनन करील, निध्यिध्यास ठेवील, आत्मस्वरुपप्राप्तीचा व्यसनी बनेल तेव्हांच तो आत्मज्ञानप्रत पोहोंचेल. " जो ज्या वस्तूचे विचार, मनन; निधिध्यास, तिव्रा-भिलाषा ठेवितो तो ती वस्तु अवश्य प्राप्त करून घेतो.' ही सर्व युक्ति स्वस्वरूप स्वनुभवगम्य स्वभाव वस्तूच्या प्राप्ती करितां आम्ही दर्शविली आहे. पुढें तुम्ही अमुक एक विशिष्ट मार्गानें विचार करा अशी सूचना देवून त्याच मार्गानें विचार करा असें वारंवार विचारतंद्री लावल्यानेंच अनादिकालापासून ज्या विचाराचा संपर्क पण झाला नाहीं त्या-च्याच दृढाभ्यासानें भेद विज्ञानाची किंवा

स्वस्वरूपस्वानुभवगम्य सम्यक्ज्ञानमयी परमात्म्याची प्राप्तीची प्राप्ती [ अनुभूति ] होईल.

**वस्तू विचारत ध्यावते मन पावे विश्राम।**
**रसस्वादत सुख ऊपजे अनुभव याको नाम॥**

तुम्ही तुमचे स्वस्वरूप स्वानुभवगम्य सम्यग्ज्ञानमयी आत्म्याला जसें होता तसें जसें आहे तसा तोच तो अहांत असे माना ? तसेच वारंवार विचार करा; आणि त्या वस्तूस्वभावधर्माचेच शुद्ध अनुभवन करा तेव्हांच परमात्मस्वरूप प्राप्ती होईल "यद्भावना तद्भविष्यति" "श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यः श्रद्धा स एव सः, प्रत्येक मनुष्य श्रद्धामय आहे. ज्याची ज्याची श्रद्धा असेल तसाच तो निःसंदेह बनतो ह्मणून नेहमीं आपली श्रद्धा ( प्रतीति ) तत्व ज्ञानानुभवांवर जेव्हां ठेवाल तेव्हां तत्वज्ञान प्राप्ती होईल. आणि श्रीमद अमृतचंद्राचार्यांनीं कलशामध्येंही असें ह्मटलें आहे 'सम्यक्दर्शनमे·

तदेव नियमादात्मा च तावानयम् ' हे मुमुक्षु प्राण्यांनो ? तुह्मी दैदिप्यमान स्वाभाविक प्रकाशणाऱ्या सूर्याला आणि काळयाकुट्ट अशा अमावस्येच्या अंधारी रात्रीला एक मानू नका ? "वस्तूच्या स्वतः सिद्ध स्वभाव शंकेला किंवा तर्कवितर्कालाला थारा देणेच मूळ अज्ञान होय. "स्वभावोऽतर्क गोचरः, त्याप्रमाणेंच ज्ञानघन परमात्मस्वरूपांतच निरंतर अखंड प्रकाशमान होत्साता जशाचे तसे स्थिर रहा. अचल व्हा; अर्थात आपल्या नैसर्गिक स्वभाव गुणाला सोडून पर अशी जी विभाव परणाति तिला आपली स्वतःची मानू नका, ह्मणजे आपल्या स्वरुपांतच निरंतर तल्लीन ( त्यातच लीन ) तन्मय [ त्यापासून वेगळेपणाचा अभाव वाटणें ] तोच सततोद्योग करणें, हाच ध्यानाचा मार्ग होय. " एकमेवाद्वितीयं ,, द्वैत भावाला विसरून सोऽहंचा .

अनुभव प्राप्त करून घेणें व शेवटी सोऽहं ला पण विसरून फक्त केवलज्ञान रूप राहणें. (फक्त ज्ञाताद्दष्टाच राहणें ) हीच खरी समाधि होय. [ ध्यान सिद्धी होय. ]

जहाँ ध्यान ध्याता ध्येय को न विकल्प वच भेद न जहाँ।
चिद्भाव कर्म चिदेशकर्ता, चेतना किया तहाँ ॥
तीनो अभिन्न अखिन्न शुध, उपयोग की निश्चल दशा
प्रगटी जहाँ दृगज्ञान व्रतये, तीनधा एकै लशा ॥ १ ॥

भावार्थः—स्वस्वरूप स्वनुभव गम्य सम्यग्ज्ञानमयी आत्मध्यानावस्थेंत ध्यान, ध्याता आणि ध्येय यांचा कांहीं एक भेद नसतो. वचनानें देखील सांगण्यासारखा कांहीं एक भेद उरत नाहीं [ नसतो ] आत्मा हाच कर्ता, कर्म व चिद्भाव हीच क्रिया होय, हे कर्ता कर्म चेतना आणि क्रिया वेगळे नाहींत ह्मणजे आपल्या स्वभाव गुणाला सोडून कर्ता, कर्म, क्रिया हे कोणी वेगळे नाहींत. अर्थात आत्मा आ-

पल्या गुणाचाच कर्ता. आत्म्याचा स्वभाव पहाणे जाणणें (ज्ञाताद्रष्टा) हेच कोणी कर्म व आपल्या स्वभावाला केव्हांहीं न सोडणें निरंतर स्वभावांतच निमग्न राहणें ( परस्वभावरूप न होणें ] हीच कोणीएक स्वभावरूप क्रिया होय. उपरोक्त तिन्हीं गुणापासून तो आत्मा अभिन्न आहे अशी शुद्ध भावना असते, आणि दर्शन ज्ञान आणि चारित्र असे व्यवहारांत जरी भेद पाडले जातात तरी शुद्ध ज्ञानांत तो आत्मा तीन गुणांचा पुंजच आहे अशा अखंड वस्तूचा अखंडच अनुभव करणें ही खरी समाधि होय.

प्रमाण—

दंसणणाणचरित्ताणि सेविदव्वाणि साहुणा णिच्च ।
ताणि पुण जाण तिण्णि वि अप्पाणं चेव णिच्छयदो

( समयप्राभृत १६ )

भावार्थ— दर्शन, ज्ञान व चारित्र हे जरी तीन प्रकार सांगितलें [ वर्णिलें ] तरी तें

आत्म्याचेच पर्याय आहेत. तें कांहीं अन्य वस्तुस्वरूप नव्हे. म्हणून साधक पुरुषांकडून निश्चितपणें एक आत्म्याचेच सेदन केलें जावो.

आपल्या स्वानुभवगम्य सम्यग्ज्ञानमयी स्वभावांतच रत होऊन [ तन्मय होऊन ] स्वतःपासून भिन्न जें परद्रव्य त्याला स्वभावतःच पर माना. आतां श्रीमत् स्वामी कुंदकुंदाचार्य विरचित समयप्राभृत ग्रंथाचें प्रमाण देतों तें ऐका. अज्ञान व जड वस्तूला सोडून (स्वभावतःच) भिन्न जाणून केवलज्ञानघन परमात्म्याचेच अवलंबन करा म्हणजे अवलंबन केल्यानें असा बोध होईल कीं; मी केवलज्ञान ( फक्त ज्ञान ) रूपं आहे. अर्थात् मी स्वाभाविक ज्ञाताद्दष्टाच आहे. माझें हें स्वरूप त्रिकालाबाधित, टंकोत्कीर्ण, अखंड आणि अविचल आहे. आणखी मी कसा आहे ?

निर्मलः केवलः शुद्धो विविक्तः प्रभुरव्ययः।
परमेष्ठी परात्मेति परमात्मेश्वरो जिनः ॥

समाधीशतक.

या शुद्ध आत्म्याला कर्मोपाधीमुळें येणारा अशुद्धपणा पण दूरच असो परंतु याला दर्शन ज्ञानचारित्र- असाही भेद नाहीं, कारण 'अनंत धर्मात्मकं तत्वं, तत्व जें आहे तें अनंत धर्मात्मक आहे परंतु वस्तूच्या असाधारण धर्मालाच ( गुणालाच , प्राधान्य देऊन उपदेश केला जातो तेंहांच अभेद शुद्ध वस्तूच्या गुण धर्माचें ज्ञान होतें. तथापि धर्माचे नाम स्वरूप भेदाला उत्पन्न करून असा उपदेश केला जातो कीं, ज्ञानीला दर्शन आहे, ज्ञान आहे, चारित्र आहे हा सर्व अभेद ( अखंड ) वस्तूंत भेद कल्पिला आहे ह्मणून व्यवहार आहे बाह्यदृष्टी आहे. परंतु जर परमार्थ ( वास्तवीक ) विचार कराल तेव्हां असे

स्पष्ट दिसेल कीं, अनंत पर्यायाला धारण करणारा असा होत्साता एकद्रव्य अभेद स्वरूपानें मिळून (गट्ट करून) बसला आहे अर्थात द्रव्याचें परिणमन ही स्वभाव रूपच्च असतें परंतु अज्ञ जनाला वेगवेगळे दिसतें हा त्यांचा दृष्टी दोष आहे.

शंका:— पर्याय ही द्रव्याचेच भेद आहेत अवस्तू तरी नाहीं तेंव्हां त्याला व्यवहार कसा म्हणावा ?

समाधान:— आपण म्हणतां तें ठीक आहे परंतु येथे शुद्ध दृष्टीनें प्राधान्य देऊन उपदेश केला आहे म्हणून अभेददृष्टीमध्यें शुद्धदृष्टी-मध्यें ( भेद ) व्यवहार किंवा ( अशुद्धदृष्टी ) गौण केल्यानेंच अभेद स्पष्ट दिसेल. अतएव भेद दृष्टीला गौण करून व्यवहार सांगितला आहे. येथें येवढे विषेश समजून घ्यावें कीं; भेद दृष्टीमध्दे निर्विकल्पावस्था प्राप्त होत

नाहीं आणि सरागी ( व्यवहारसम्यक्त्वीला ) विकल्प असतो. जोपर्यंत रागादिक परद्रव्या विषयींचा अंहकार ममकार मिटला नाहीं ( पर जाणले नाहीं ) तो पर्यंत भेदाला गौणत्व करून अभेदरूप निर्विकल्प दशेचा अनुभव करविला आहे निर्विकल्परूप ( वीत-राग ) स्वानुभव झाल्यावर भेदाभेदरूप वस्तूचा फक्त ज्ञाता द्रष्टाच राहतो. तेव्हां कोणत्याही नयाचे आलंबन ( जरूरी ) नसतें.

शंका:— असे जर आहे तर मग फक्त परमार्थाचाच उपदेश कां केला नाहीं ? व्यव-हाराचाही पुन्हां कां केला ?

समाधान:— वस्तूंत जसें अनेक धर्म आहेत तसेंच त्या वस्तुकडे पाहाण्याच्या दृष्टी पण अनेक आहेत. जो जसें पाहतो त्याला तसें दिसतें परंतु तें दिसणें सर्वांगीण नसतें

अर्थात् सर्वांगीण पाहिल्या शिवाय वस्तूचें विशिष्टत्व व सामान्यत्व ओळखतां येणार नाहीं. जसें एखाद्या इंग्लिश माणसाकडून आपणांस कांहीं ज्ञान प्राप्त करून घ्यावयाचें आहे परंतु आपणांस इंग्लिश येत नाहीं व त्या इंग्रजाला माहाराष्ट्र भाषा येत नाहीं अशा प्रसंगीं परस्परांचे पूर्ण भाव जाणण्या-करितां दूभाषेचा चांगला अनुभवी पाहिजे तेव्हां आपलें समाधान होईल. त्याप्रमा-णेंच शुद्धात्मा विषयीं जगांत कसा व्यवहार केला जातो आणि वास्तविक ती वस्तु कशी आहे हें स्याद्वादानेंच म्हणजे व्यवहारानें व निश्चयनयानें जाणलें जातें.

भावार्थः— हा आत्मा स्वभावतः निर्मल म्हणजे ज्ञानावर्णीयादि कर्ममलानें रहित ( भिन्न ) आहे लोक आणि अलोकाला प्रकाशित करतेवेळीं त्याला बाह्य वस्तूची अपेक्षा

पडत नाहीं ते फक्त संपूर्ण पदार्थांना प्रकाशित करतें म्हणून त्याला केवल असें ह्मणतात द्रव्यकर्म, भावकर्म आणि नोकर्मांचा त्याच्या ठिकाणीं अभाव असल्यामुळें त्याची अनंत ज्ञानादिरूप परिणति राहते याकरितां त्याला [ शुद्ध ] असे म्हणतात. शरीर किंवा कर्में वगैरे त्या अमूर्तिक द्रव्याला स्पर्शही करूं शकत नाहीं ह्मणून त्याला " विविक्त ,, ( निराळा ) असें म्हणतात. अनंत चतुष्टयात्मक आपल्या स्वरूपांपासून हेही ढळत नाहीं. म्हणून आत्म्याला ' अच्युत ' असें ह्मणतात. त्रैलोक्यातील सर्व प्राण्याकडून वंदण्यास योग्य अशा आपल्या उत्कृष्ट स्वभावांतच राहतो ह्मणून त्याला ' परमेष्ठी ' असें ह्मणतात. तो बहिरात्म्यापासून वेगळा असल्यामुळें त्याला परात्मा ह्मणजे उत्कृष्टात्मा असें म्हणतात. जसें सूर्य या भूमंडलाला

स्वयं प्रकाशित करतो. त्याप्रमाणेंच जो लोकालोकाला प्रकाशतो ह्मणजे ज्याचे प्रकाशानें हा लोकाकाश व अलोकाकाश प्रकाशतो म्हणून त्याला 'ईश्वर किंवा प्रभु, असें म्हणतात आणि संपूर्ण परद्रव्य कर्मांचा ज्ञाताद्रष्टा असून देखील कर्मरूप होत नाहीं परन्तु निरंतर ज्ञानादि चेतनधर्मरूपानें परिणमन करीत राहतो म्हणून त्याला जिन असें म्हणतात.

अर्थात् उपरोक्त लक्षणानीं युक्त असा तो परमात्मस्वरूप ज्ञानभानु लोक अलोकापासून जन्म मरण; नामादिकापासून अथवा तन, मन, धन, वचनादिकापासून, शुभाशुभरूप पुण्यपाप आणि द्रव्यकर्म, भावकर्म, नोकर्म वगैरे पासून स्वभावतः वेगळा आहे. आतां श्रीमत् कुंदकुंदस्वामी काय म्हणतात ते तरी ऐकून मग खऱ्या वस्तुस्वभावाची परीक्षा करून घ्या.

शास्त्रंज्ञानं न भवति, यस्माच्छास्त्रं न जानाति किंचित्
तस्मादन्यज्ज्ञानमन्यच्छास्त्रं जिना विंदंति ॥ १ ॥
शब्दो ज्ञानं न भवति यस्माच्छब्दो न जानाति किंचित्
तस्मादन्यज्ज्ञानमन्यं शब्दं जिना विन्दंति ॥ २ ॥
रूपं ज्ञानं न भवति यस्माद्रूपं न जानाति किंचित् ॥
तस्मादन्यज्ज्ञानमन्यद्रूपं जिना विंदंति ॥ ३ ॥
वर्णो ज्ञानं न भवति यस्माद्वर्णो न जानाति किंचित् ॥
तस्मादन्यज्ज्ञानमन्यं वर्णं जिना विंदंति ॥ ४ ॥
गन्धो ज्ञानं न भवति यस्माद्गन्धो न जानाति किंचित्
तस्मादन्यज्ज्ञानमन्यं गंधं जिना विन्दन्ति ॥ ५ ॥
न रसस्तु भवति ज्ञानं यस्मात्तु रसो न जानाति किंचित्
तस्मादन्यज्ज्ञानं रसं चान्यं जिना विन्दन्ति ॥ ६ ॥
स्पर्शो न भवति ज्ञानं यस्मात्स्पर्शो न जानाति किंचित्
तस्मादन्यज्ज्ञानमन्यं स्पर्शं जिना विन्दन्ति ॥ ७ ॥
कर्म ज्ञानं न भवति यस्मात्कर्म न जानाति किंचित्।
तस्मादन्यज्ज्ञानमन्यत्कर्म जिना विन्दंति ॥ ८ ॥
धर्मो ज्ञानं न भवति यस्माद्धर्मो न जानाति किंचित्।
तस्मादन्यज्ज्ञानमन्यं धर्मं जिना विंदंति ॥ ९ ॥
ज्ञानमधर्मो न भवति यस्मादधर्मो न जानाति किंचित्।
तस्मादन्यज्ज्ञानमन्यमधर्मं जिना विंदंति ॥ १० ॥
कालो ज्ञानं न भवति यस्मात्कालो न जानाति किंचित्
तस्मादन्यज्ज्ञानमन्यं कालं जिना विन्दंति ॥ ११ ॥

आकाशमपि न ज्ञानं यस्मादाकाशं न जानाति किंचित
तस्मादाकाशमन्यज्ज्ञानं जिना विंदंति ॥ १२ ॥
नाध्यवसानं ज्ञानमध्यवसानमचेतनं यस्मात् ।
तस्मादन्यज्ज्ञानमध्यवसानं तथाऽन्यत् ॥ १३ ॥
यस्माज्जानाति नित्यं तस्माज्जीवस्तु ज्ञायको ज्ञानी ।
ज्ञानं च ज्ञायकादव्यतिरिक्तं ज्ञातव्यम् ॥ १४
ज्ञानं सम्यग्दृष्टिं तु संयमं सूत्रमङ्गपूर्वगतम् ।
धर्माधर्मं च तथा प्रव्रज्यामभ्युपयांति बुधाः ॥१५॥

ज्ञान आहे तें स्वाभाविकच चार गती चौऱ्यांशीलक्षयोनी व चराचर वस्तूला आरशांत प्रतिबिंबित झालेल्या वस्तूप्रमाणें पहाते–जाणते [ ज्ञानांत हें सर्व नैसर्गिकच दिसते ] परंतु स्वतःपासून अत्यंत भिन्न अशा प्रपंचांत केव्हांही कोणत्याही प्रकारें मिळत नाहीं—तन्मय होत नाहीं. कारण ह्या प्रपंचांतील नाना प्रकार ( विकाररूप ) पदार्थांचें नाटक पहाण्यांत जी मजा व आनंद वाटतो ती मजा व तो आनंद प्रत्येक घटचेला सोंग घेऊन नाचण्यांत नाहीं.

कारण ते त्याच्या (स्वपरप्रकाशक ज्ञानसूर्याच्या) स्वभावविरुद्ध—प्रकृतिविरुद्ध आहे. अर्थात जीवावांचून हा सर्व लोकालोक प्रपंच म्हणजे जन्म, मरण, नामादिक, शुभाशुभरूप पाप-पुण्य, तन, मन, धन, वचनादिकस्वरूपी जग किंवा संसार जड असल्यामुळें स्वभावतः आंधळे आहे. म्हणून त्याचें सोंग घेणें त्याला स्वतःला दिसत नाहीं. ह्या सर्व ज्ञानशून्य वस्तूला स्वस्वरूपस्वानुभवगम्य सम्यग्ज्ञानमयी ज्ञानभानूच प्रकाशतो म्हणजे पहातो—जाणतो किंवा स्वभावतःच दिसते. कोटीसूर्यप्रकाशाला पण जो स्वयं प्रकाशतो अशा त्या लोकालोक प्रकाशक ज्ञानरूप सूर्यांत हा सर्व लोकालोकरूप जग किंवा संसार अणूप्रमाणें भासतो. म्हणून भव्यात्मानों अनादिकालापासून ती अपूर्व विभूतीपासून पराङ्मुख राहिल्यामुळें हा वेळ पावेतों नाना तऱ्हेच्या सोंगढोंगरूप नाच-

ण्यालाच तुम्ही मदिरापान केलेल्या प्राण्याप्रमाणें आपलेंच स्वरूप मानलें व पुष्कळ आपदा ( जें स्वपद नव्हे तें आपद ) भोगल्या परन्तु आतां तरी आगमप्रमाण किंवा सद्गुरुवचन प्रमाण असें स्वपद ओळखा. ( स्वतःचें जें पद, धर्म किंवा गुण तें स्वपद ) व सच्चिदानंदांत निमग्न व्हा.

जसें अज्ञानी राजावर ज्ञानी राजा राज्य चालवूं शकतो परंतु ज्ञानी राजावर अज्ञानी राजा राज्य चालवूं शकत नाहीं तसें अज्ञानवस्तूला ज्ञान जाणतें परंतु ज्ञानवस्तूला अज्ञान जाणूं शकत नाहीं ही गोष्ट बरोबरच आहे. एखाद्या वस्तूचे ज्ञानाशिवाय [ अनुभव ज्ञानाशिवाय ] कथन करणें म्हणजे नाका शिवाय नथ घालण्याचा प्रयास केल्याप्रमाणें हास्यास्पद किंवा मूर्खत्वाचें ठरेल.

तसेंच जोपर्यन्त अज्ञान ( स्वपरभेद ज्ञान शून्यत्व ) आहे तो पर्यंतच हा संसार किंवा संसारासंबंधी शरीरादि किंवा शरीराश्रित कुटुंबादि भाई, बंधु, वगैरे नातेगोते, मानापमान, उच्च, नीचता वगैरे आपलें आहे-वाटतें परंतु ते स्वपर भेदज्ञान प्राप्तीझाल्यावर मुळांतच ज्याचा संबंध नाहीं त्याचा संबंध कसे मानील आणि जर तसे मानील तर भेदज्ञान तें काय ? ' भेदज्ञानी जरी बाह्यदृष्टीनें सर्व लौकिक व्यवहार करतो तरी तो त्या संपूर्ण व्यवहारापासून बाहेर असतो. म्हणजे अज्ञानावस्थेंत जीं जीं कर्मे ह्या जीवात्म्यानें संपादन केलीं आहेत तीं तीं कर्मे उदयोन्मुख झालीं असतां ज्ञानी किंवा अज्ञानीला सारखीं भोगावीं लागतात. त्यांत विशेष इतकाच कीं, भेदज्ञानी ह्या सुखदुःखात्मक फळाला कर्मजन्य पर मानतो आणि अज्ञानी

( बाह्यदृष्टी ) त्याच कर्मजन्य फळाला अहं-मन्यतेनें भोगतो, म्हणून अज्ञानीला कर्म-जन्य रसास्वादांत सुख किंवा दुःख जास्त वाटतें, परन्तु अन्तरदृष्टी, भेदविज्ञानी जरी बाह्यतः तसाच सुखी दुःखी दिसतो तरी तो तसा नसतो. ( तो ज्ञाताद्दष्टाच रहातो.

स्वयंपाकगृहांत स्वयंपाकाची सर्व सामुग्री आहे. परतु विस्तव नसेल तर जसी ती सर्व सामुग्री कच्ची राहील तसेंच फक्त एका (केवल) ज्ञानाशिवाय नियम, धर्म, व्रत, उपवास, दान पूजा शुभाशुभ ही सर्व सामुग्री व्यर्थ होईल. म्हणजे ' ज्या सामुग्रीपासून आपली इष्टसिद्धि नाहीं ती सामुग्री व्यर्थ होय. , अर्थात् ज्या नियम, धर्म, व्रत, उपवास, दान, पूजा वगैरे सामुग्रीपासून जी सिद्धि प्राप्त करून घ्यावयाची ती त्या एका ज्ञानाशिवाय प्राप्त

होणें मुळींच शक्य नाहीं. उलट अज्ञानीचा त्यागधर्म सुद्धां जास्तच बंधाला कारण होतो; म्हणून जी क्रिया करणें असेल ती सम्यग्ज्ञानपूर्वक करावी.

**जी गोष्ट ज्ञानी अगदीं सहजस्वाभाविक करूं शकतो तीच गोष्ट अज्ञानी अत्यंत प्रयासानें देखिल करूं शकत नाहींच मात्र उलट बिघडून टाकतो ,,**

कोटिजन्म तपतपै, ज्ञानबिन कर्म झरैं जे।
ज्ञानीके छिनमें त्रिगुप्ति तैं सहज टरैं ते ॥
मुनिव्रत धार अनंत बार ग्रीवक उपजायो।
पै निज आतम ज्ञान, विना सुख लेश न पायो ॥

भावार्थः—स्वस्वरूप स्वनुभवगम्य ज्ञानाशिवाय अज्ञानी जीव कोटिजन्मात अनेक प्रकारचीं तपें करून जितक्या कर्मांना दूर करतो तितक्याच कर्मास ज्ञानी एका क्षणांत

मन वचन कायेच्या क्रियांना भेद विज्ञानानें पर जाणल्यामुळें नाशकरतो. ह्या बहिरदृष्टी जीवात्म्यानें अनंत वेळां मुनी व्रतादि केले आणि पुण्य स्वरूप जे फळ ग्रैवेयक विमाना मध्यें पुष्कळ वेळा जन्म घेतला परंतु तो तेथें देखील आत्मज्ञानीशिवाय थोडें सुख प्राप्त करूं शकला नाहीं. त्याप्रमाणें श्रीमंत स्वामी योगींद्रचंद्र आचार्य विरचित परमात्म प्रकाशग्रंथांत असें संबोधलें आहे कीं 'हे प्रभाकर भट्ट! धर्म ह्मणजे पुण्यरूप मुनिधर्म व अर्थ ह्मणजे संसारांतील प्रयोजनभूत इष्टसिद्धी काम ह्मणजे विषयाभिलाषा ह्या तिन्हींही तूं स्वतः पासून भिन्न ( पर ) आहेत असे समज. धर्म, अर्थ, काम हे तिन्हीं ज्ञानरूप नाहींत म्हणून स्वतःपासून भिन्न आहेत. हें पक्कें लक्षांत ठेव कीं, तूं तन, मन, धन, वचन शब्दादिक

पुद्गल, धर्म, अधर्म, आकाश, कालादींनां अग्निउष्णता जशी अभिन्न म्हणजे वेगवेगळी नाहीं अर्थात् जशीं अग्निउष्णता अगदीं एकच तन्मय आहे तसें एक तन्मय मानूं नकोस.

इति चित्रद्वाराविवर्णयुक्ति संपूर्ण.



शुभ आणि अशुभ हे दोन्हीं विकल्प आहेत. तसेंच संसाराचें कारण आहेत. जेव्हां हा प्राणी या दोन्हीं अवस्थेनीं रहित, शुद्ध, निर्विकल्पसमाधिरूप अवस्थेमध्यें लीन होतो, तेव्हां हा आत्मस्वरूपाचा अनुभव करतो. ही गोष्ट दृष्टान्तद्वारें स्पष्ट करतात.

दृष्टांत—एका महालाला दोन दरवाजे आहेत. त्यामध्यें प्रवेश करणाऱ्या माणसाला दोघें द्वारपाल असें सांगतात कीं, ह्या दरवाजानें जाल तर तुम्हांला जीव, चेतन ज्ञानादि वस्तु पहाण्यास मिळतील. आणि दुसरा म्हणतो कीं, ह्या दरवाजानें आंत जाल तर तुम्हाला अजीव, अज्ञान, अचेतन जड वस्तु पहाण्यास सांपडतील. आणि जर तुम्हीं दोन्हीं दरवाजांतून पूर्ण श्रद्धेनें जीव, अजीव ज्ञानाज्ञानाचें लक्षण भेदानें परस्पर जात्यादिक

समजून मनाची दुविधा सोडून व संकल्प[1] विकल्प[2] सोडून स्वस्थ ( स्वतःमध्येंच ) स्थिर रहाल तर तुम्हांला तुमचें स्वस्वरूपस्वानुभवगम्य स्वपर भेदज्ञानरूप अमौल्य अशा परमात्मवस्तूंचा लाभ मिळेल. या विषयीं श्रीमत् स्वामी अमृत- चंद्रसूरि विरचित पुरुषार्थ सिद्धि उपाय ग्रंथांत म्हटलें आहे कीं—

व्यवहारनिश्चयौ यः प्रबुध्य तत्वेन भवति मध्यस्थः ।
प्राप्नोति देशनायाः स एव फलमविकलं शिष्यः ॥

भावार्थ— जो मनुष्य वास्तविकपणें व्यव- हार व निश्चय ह्या दोन नयाचें अवलंबन कोठप- र्यंत करावयाचें हें योग्यरीतीनें जाणून म्हणजे साधकअवस्थेंत दोन्हीं नयाचें आधारें वस्तूचें व्यावहारिक व तात्विक स्वरूप जाणून नंतर दोन्हीं नयांचें आलंबन सोडून खऱ्या स्वरू-

१ द्रव्यकर्म, भावकर्म, नोकर्म आदि पुद्गलद्रव्याला आत्मा मानणें याला संकल्प म्हणतात.

२ ज्ञेयाच्या भेदामुळें ज्ञानांत भेद मानणें म्हणजे अभेद- वस्तूला भेदरूप मानणें याला विकल्प म्हणतात.

पाच्या प्रतीतींतच निरत राहण्याची पात्रता ठेवतो तोच मनुष्य उपदेशद्वारा किंवा आगम द्वारा आपली स्वस्वरूपस्वानुभवगम्य सम्यग्ज्ञान-मयी परमात्मस्वरूप संपूर्ण फलाला प्राप्त होतो.

व्यवहानयाची आवश्यकता—

अबुधस्य बोधनार्थं मुनीश्वरो देशयत्यभूतार्थम् ।
व्यवहारमेव केवलमवैति यस्त देशना नास्ति ॥

भावार्थ— आचार्य महाराजांनीं अज्ञानी बहिर्दृष्टीला ज्ञानसंपादन करण्याकरितां व्यवहार-नयाचा उपदेश दिला आहे, परन्तु जो केवल व्यवहारनयाचाच कट्टर बनेल त्याला उपदेश करणें व्यर्थ आहे, असें अमृतचंद्रस्वामींनीं पुरु-षार्थसिद्धि उपायांत वर्णिलें आहे.

केवल व्यवहारनयवादी हटग्राहीला उप-देश कां नाहीं त्याचें कारण—

आत्मख्यातिग्रंथांत श्रीमत् अमृतचंद्रसूरि-कृत कलशांत म्हटलें आहे कीं:—

व्यवहरणनयः स्याद्यद्यपिप्राक्पदव्या- ।
मिहनिहितपदानां हन्त हस्तावलंबः ॥
तदपिपरममर्थं चिच्चमत्कारमात्रं ।
परविरहितमंतः पश्यतां नैष किंचित् ॥

भावार्थः— व्यवहारनय जो आहे तो पहिल्या अवस्थेत म्हणजे जोपर्यन्त शुद्धनिश्चयनयाची आधारभूत शुद्ध स्वरूपाची प्राप्ति झाली नाहीं तोपर्यन्तच जसा वृद्धत्यालाच हस्तावलंब तसा व्यवहारनय अज्ञानीला हस्तावलंबरूप आहे. परंतु मोठ्या दुःखाची गोष्ट ही आहे कीं, ज्या पुरूषानीं चैतन्यसत्यार्थमात्र शुद्धनयाचा विषयभूत परद्रव्य व परभावापासून रहित अशा परमार्थ तत्त्वाला अंतरंगांत ( अंतरदृष्टीनें ) अवलोकन केलें, त्यांचेच श्रद्धान केलें; आणि त्याच स्वरूपांत लीन झालें त्यांना हा व्यवहारनय कांहींएक उपयोगाचा नाहीं. कारण व्यवहारनय अभू—

तार्थ आहे—असत्यार्थ आहे. आत्मख्यातिग्रंथांत असें वारंवार दृष्टोत्पत्तीस येतें. म्हणजे व्यवहारांत अशा भाषेचाच प्रचार आहे कीं; जे गुणधर्म ज्या वस्तूंत नसतात ते गुणधर्म दुसऱ्या वस्तूंत आरोपित करतात. जसें तुपाची घागर, अंगांत अंगरखा घालणें, एखाद्या सोनाराची किंवा लोहाराची भट्टी पेटली असतां आमचें दुकान पेटलें असा शब्दप्रयोग करणें आणि एखाद्या सावकाराच्या नोकरानें सावकाराच्या दुकानाला किंवा घराला आमचें घर अथवा त्या सावकाराच्या शेठाणीला आमची मालकीन [ बायकोलाही मालकीण म्हणतात. ] असा शब्दप्रयोग करणें हा व्यवहार होय. त्याचप्रमाणें स्वस्वरूप स्वानुभवगम्य सम्यग्ज्ञानमयी आत्म्याला अज्ञानी, रागी, द्वेषी, मोही म्हणणें किंवा चैतन्यस्वरूपी आत्म्याला सोडून शरीरालाच आत्मा मानणें अर्थात् मीच खातो, पितो,

भीच सुखदुःख भोगतो. म्हणजे ज्याचा आपला स्वभावतः कांहींएक संबंध नसतां त्या व्यवहाराच्या भाषेवरून पदार्थाच्या लक्षणभेद जाणून यथार्थ ज्ञान प्राप्त करून घ्यावयाचें तर दूर राहो, परन्तु अनादिकालाच्या संस्कारामुळें विपरीत श्रद्धान मात्र तेव्हांच करतो. ही मोठी खेदाची गोष्ट आहे. यथार्थतः व्यवहारनय खोटा नाहीं. परंतु त्या व्यवहारनयाच्या भाषेवरून आपण आपली समजूत विपरीत करून घेतो, तीच खोटी आहे. ज्याप्रमाणें तुपाची घागर कोणीही आतांपर्यंत पाहिली नाहीं किंवा एखाद्या आविष्कर्त्यानें आतांपर्यंत तरी तुपाची घागर केल्याचें ऐकीवात नाहीं. घागर मातीची किंवा धातूचीच बनते. तसेच नोकरानें शेटजीच्या दुकानाला व घराला जरी आमचें दुकान आमचें घर असें म्हटलें असतां त्याला व्यवहारांत

कोणीही असत्य भाषी म्हणत नाहींत व तत्वत: त्याला असत्याचा दोष पण लागत नाहीं. कारण त्याची दृष्टी मालकाच्या अपेक्षेनें असतें त्याचप्रमाणें चैतन्यस्वरूपी आत्म्याला संकल्प विकल्पात्मक आणि रागद्वेशादि विकाराला व्यवरानें आत्म्याचे आहेत असे केवळ म्हटल्या-नेच दोष येत नसून ही विभाव परणति त्या परमात्म्याचीच आहे असें मानल्यानेंच दोष उत्पन्न होतो ह्यालाच मिथ्यात्व बहिर्दृष्टी किंवा अतत्वज्ञानी असें म्हणतात. आणि अज्ञानी किंवा तत्वज्ञानशून्याला जर असें वाटले तर त्यात नवल किंवा आश्चर्य तें काय? व ज्ञानी व अज्ञानींत भेद तो काय राहील! अर्थात् " व्यवहारनय भेददृष्टीनें व शुद्धनय अभे-ददृष्टीनें खरा आहे. आत्मख्याति ग्रथांत म्हटले आहे.:—

## शुद्धनय म्हणजे काय

आत्मस्वभावं परभावभिन्न- ।
मापूर्णमाद्यन्त विमुक्तमेकम् ॥
विलीनसंकल्पविकल्प जालं ।
प्रकाशयन् शुद्धनयोऽभ्युदेति ॥ १ ॥

भावार्थः—— शुद्धनय म्हणजे शुद्धनय म्हणा किंवा आत्मानुभूति म्हणा अथवा फक्त अभेद म्हणा; कारण शुद्ध नय आहे तो आत्म्याच्या स्वभावाला प्रगट करणारा असा होत्साता उदित होतो. तो कसा उदित होतो म्हणाल तर, परद्रव्य आणि परद्रव्याचे भाव तसेंच परद्रव्याच्या निमित्तानें होणाऱ्या चिदाभासाच्या रागद्वेषादि परभावापासून भिन्न असें प्रगट होतो. कसें प्रगट करतो असें विचाराल तर आपूर्ण म्हणजे संपूर्ण लोकालोकाच्या ज्ञाता द्रष्टा—स्वभावाला प्रगट करतो. व आत्मा कसा आहे? आदि, अंतरहित म्हणजे ज्याला केव्हांही

जन्ममरण नाहीं. आणखी कसा आहे ? एक आहे सर्व भेदभावापासून भिन्न [ द्वैतभावापासून वेगळा ) एकाकार त्याचप्रमाणें संकल्प म्हणजे द्रव्यकर्म, भावकर्म नोकर्म आदि पुद्गलद्रव्यालाच आपला स्वभाव मानणें आणि विकल्प म्हणजे नाना तऱ्हेच्या ज्ञेयावरून ज्ञानाला पण नाना तऱ्हेचें मानणें हे मनोधर्म ज्यांत मुळींच नाहींत अशा स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञानमयी परमात्म्याचें स्वरूप शुद्ध नयच प्रकाशित करतो; म्हणून भव्यात्मानों, जोंपर्यंत तत्वप्रीति उत्पन्न झाली नाहीं तोंपर्यंत व्यवहारनयच कार्यकारी आहे आणि जेव्हां सद्गुरुप्रसाद किंवा काललब्धि प्राप्त होईल तेव्हां शुद्ध नयाचेच अवलंबन करून शुद्ध आत्मस्वरूपाची प्रतीति होईपर्यन्त त्यांतच दृढ श्रद्धानी बनून रहा व आजपर्यंत भेद–

दृष्टीनें ( व्यवहारानें ) आपण आत्मस्वरूप कसें मानित होतो ? आतां निश्चयदृष्टीनें कसें आहे तें प्रत्यक्ष अवलोकन करा व त्या तच राहा व त्रिकालाबाधित ज्ञानस्वरूप परमात्मा बनून जा म्हणजे साधक अवस्थेंत तुम्हाला वस्तुस्वभावाचा विचार करण्यास जे दोन नय मदत करीत होतें ते ही आतां सिद्धावस्थेंत तुमच्या पासून अत्यंत भिन्न असल्या कारणानें आपोआप सुटून जातील. जसें इष्ट स्थळीं पोहोंचल्यावर मार्ग आपे:-आप स्वयं सुटून जातो.

" हे मुमुक्षुनो ,, येवढे मात्र पूर्णपणें लक्षांत असू द्या कीं, आपण अनादिकाला पासून तत्वज्ञानप्राप्तीची इच्छा केली नाहीं किंवा शुद्धनयाचा अभ्यास सद्गुरूद्वारा केला नाहीं किंवा काललब्धिच्या अभावी

अथवा सद्गुरूच्या अभावी आपणास यथार्थ तत्वरुचि झाली नाहीं, परन्तु अनादिकालापासून पर्याया.र्थिकनयाचे संस्कारानें दृढ संस्कारी झाल्यामुळें अध्यात्म ग्रंथावर किंवा तत्वस्वरूपावर आणि स्वभावरूप सम्य- ज्ञानावर रुचि प्राप्त होत नाहीं. म्हणून पर- स्पर विरूद्ध धर्मी जसें सूर्य आणि अंध- कार केव्हांही एक होत नाहींत तसेंच ज्ञान व अज्ञान, चैतन्य व अचैतन्य अमूर्तिक व मूर्तिक केव्हांही कोणत्याप्रकारें—कोणत्याही- कारणानें एक होत नाहीं म्हणून शुद्ध नयानें जाणून त्याचेच परिशीलन करा! नाहीं तर पुन्हां बहीर्दृष्टी बनून ज्ञानाला व अज्ञानाला (ज्ञेयाला) चैतन्याला व अचैतन्याला आणि मूर्तिकाला

व अमूर्तिकाला सूर्य व प्रकाश जसा अभिन्न ( वेगळा नसतो ) असतो तसें मानाल तर सम्यग्ज्ञानानुभवाची अवगाढता होणार नाहीं.

इति व्यवहार व निश्चयनय कथन समाप्त.



## ॥ अथ वस्तु स्वभाव विवर्ण चित्रसहित ॥

सम्यग्ज्ञान स्वभावमें लीन भये जिनराज ॥
धर्मदास क्षुल्लक करै नत्वा निशिदिन साज ॥ १ ॥

प्रत्येक प्राणीमात्राची जी जी म्हणून खटपट किंवा जो उद्योग दिसतो तो सर्व सुखांकरितांच चाललेला असतो परंतु फल मात्र उलट दिसतें त्याचे कारण वस्तूच्या स्वभावांचे अज्ञान होय. कारणः—

ह्यां[1] जगांत चित्र विचित्र अशा बाह्य वस्तूच्या रूपांत रंगून गेलेलें ( तल्लीन झालेलें ) अशी पुष्कळ प्राणी आहेत परंतु वास्तविक तत्वज्ञानाचा आश्रय करणारे किंवा जाणणारे फारच थोडे आहेत. त्यामध्यें सार

---

१ अत्यंतं बहिरंगरंगरसिकास्त्यक्तात्मसंवित्तयः- ।
संख्यातुं कति यांति ये तु कृतिनो जिज्ञासवः केचन ।
कार्या तैरहितान्निवृत्तिरनु च प्राप्तिः प्रयत्नैर्हिते—
दुःखोदर्कमिहाहितं सुखरसोदर्कं हितं तर्क्यताम् ३२
[ आत्मप्रबोध ]

भूत अशा आत्म तत्वाला जाणारें विरळेंच म्हणजे एका हाताच्या बोटावर मोजण्यासही सांपडणें अत्यंत दुर्गम झालें आहे. ह्या करितां बुद्धिमानानीं वस्तूच्या यथार्थ स्वभावाला जाणून अयथार्थ वस्तूचा [ खोट्यामार्गाचा, मिथ्यात्वाचा मोहाचा किंवा अतत्वश्रद्धानाचा] त्याग करावा अर्थात् स्वपरज्ञान करून घ्यावें.

आजपर्यन्त अज्ञानानें नाशवंत वस्तुलांच शाश्वत, अज्ञानाला ज्ञान, दुःखाला सुख व पर पदार्थाला आपलें मानीत आलों, तसेंच बोलत आलों, व त्या प्रमाणेंच आचरण पण केले त्यांचें फळ अनन्त संसार.

हें सांसारिक इंद्रियजन्य सुख[1] स्वाधीन नसून परा-

१ अस्वाधीनमसारमंतविरसं दुःखप्रदं वाऽयतौ ।
शास्त्रे प्रस्तुतमत्र निर्वृतिपथे सौख्यं न सांसारिकम् ।
स्वाधीनं निरुपाधि बाधरहितं निःसीमं यत्तत्सुखं ॥
विद्या तज्जननीं हिताय समुपादद्यादविद्यां त्यजेत् २२
आत्मप्रबोध.

धीन आहे. तें कर्मजनित असतें तर तें आरंभी मधुर वाटतें परंतु शेवटीं तें तसें नसतें म्हणजे इंद्रियजन्य सुखाचा अंत पण अत्यंत दुःखांत होतो म्हणून संसार दुःखमय वाटतो. परंतु ह्याच दुःखमय संसारांत तत्वज्ञानी किंवा आत्मज्ञानी निरंतर सुखाचाच अनुभव घेतो अर्थात् तो इंद्रियजन्य सुख दुःखाला स्वरूप मानीत नसतो. त्यानें वस्तूचा स्वभाव जाणल्यामुळें सदोदित आपल्या स्वरूपांतच तन्मय असतो. ह्या करितां हितेच्छु प्राण्यानीं विद्येचा ( तत्वज्ञानाचा ) आश्रय करावा. आणि अविद्येचा ( मिथ्यात्वाचा ) त्याग करावा.

१ पहा अविद्येचा वंशवृक्ष. दृष्टांत—

---

१ एतस्या ममताकलत्रसहिताऽहंकारनामात्मजः
संकल्पौ स्वपरात्मकावथ तयोः पुत्रौ ततश्चैतयोः

श्रीमदुउमास्वामी आचार्यांनीं तत्वार्थ सूत्रांत जी सांत तत्वें सांगितली त्यामध्यें जीव आणि अजीव हीच दोन मुख्य आहे. जीव वस्तूला सोडून अजीव वस्तूं अज्ञानमय

---

भार्ये रत्यरती सुखासुखसुतप्रोल्हासिते इत्यहो,
संतानेन सहाक्षयेण महती नंदत्यविद्या चिरम् ३९

आत्मप्रबोध.



जड आहेत. ह्यांत स्वतःला किंवा पर पदार्थाला [ जीवाला ] पहाण्याचा किंवा जाणण्याचा गुण धर्म मुळींच नाहीं. परंतु जीवांत मात्र स्वपर पदार्थाला पाहण्याचा जणण्याचा स्वाभाविक धर्म आहे, म्हणूनच सर्व शास्त्र पुराणातून—वेद स्मृतींतून जीव द्रव्यालाच ग्राह्य म्हटलें आहे. वास्तविक प्रत्येक द्रव्य आपआपले महत्वपरिपूर्ण आहे अर्थात् एक द्रव्य दुसऱ्याचा गुणधर्म धारण करीत नसतें. जे तें आपआपल्या स्वभावात त्रिकालाबाधित निमग्न असतें म्हणून ज्ञानीला गाह्य व अग्राह्य असे जगांत मुळींच तत्व किंवा वस्तू नसते. ज्ञानी फक्त ज्ञाता दृष्टाच असतो. ग्राह्याग्राह्य हा भेद व्यवहारांत अज्ञानाच्या दृष्टीनें फक्त साधक अवस्थेंतच दिसून येतो वस्तूच्या स्वभावात हा भेद मुळींच संभवत नाहीं जे जीव गुरूपदेशानें

आपलें स्वस्वरूपस्वानुभवगम्य सम्यग्ज्ञानमयी स्वभाव वस्तु समजून गेले तेच जीव या जगतीतलावर धन्य व पूज्य झालें. जसें मेंढराच्या कळपांत पाळलेल्या सिंहाच्या बच्चाला पण आपण स्वतः सिंह आहे. याचे भान न राहतां मेंढरूच आहे असे संस्कारामुळें वाटतें तसेच संसारी जीवाला पण आपण आपल्या चैतन्य मय ज्ञान गुणापासून परान्मुख असून जड अज्ञान मयी झालो असें वाटतें. हा सर्व अनादि-कालीन झालेल्या अविद्यारूप संस्काराचांच प्रताप होय. जसें त्या मेंढराच्या कळपांत पाळलेल्या सिंहाला आपलें स्वस्वरूपांविष-यीं अज्ञानामुळेंच मेंढराच्या कळपांत पर-तंत्रंत दिवस कंठावे लागतात. तसेच जीवाला पण आपले स्वस्वरूप ओळखतां आलें नाहीं म्हणून आतां पर्यन्त संसार

चक्रांत गुंतावे लागले आहे. व अनादि कालीन सद्‌गुरूच्या किंवा काललब्धीच्या अभावी विभावालाच स्वभाव समजून उन्मत्त किंवा वेड्याप्रमाणें वाटेल तसे बरळतो किंवा चेष्टा करितो अर्थात् राग-द्वेष, जन्म-मरण, नाम-अनाम, आकार-निराकार, तन, मन धन, वचन, विचार, बुद्धि, संकल्प, विकल्प, मोह, काम, क्रोध, मान, माया, लोभ, पाप, पुण्यादिक जे विभाव आहेत तेंच मी आहे. असें समजणारा तो स्वस्वरूप ज्ञान रहित अज्ञानी आहे. संसारी आहे, किंवा अशुद्ध म्हणजे मेंढराच्या कळपांत पाळलेल्या सिंहाप्रमाणें भ्रमिष्ट आहे.

जी अवस्था स्वस्वरूपज्ञानरहित अशुद्ध किंवा संसारी असें मानली जाते. ती जीवाची वैभाविक अवस्था आहें ही अवस्था अनादिकालापासून आहे हा जीव

अशुद्ध अवस्थेंत असतांना ( ह्याला स्वभाव ओळख पटली नसतांना ) बहिर्दृष्टीनें ( व्यवहारदृष्टीनें किंवा देहात्मबुद्धीनें ) शरीर किंवा सूक्ष्म पुद्गल अथवा कार्माणवर्गणेच्या निमित्तानें मूर्त असा ह्मटला जातो परंतु ही मूर्तता केवल संबंधजनित बाह्यदृष्टीनें आहे, निश्चयदृष्टीनें पाहिलें तर आत्मा अमूर्त आहे पुद्गलच मूर्त आहे. रूप, रस, गंध, वर्णालाच मूर्त असें म्हणतात अशी मूर्तिकता एका पुद्गला शिवाय अन्य पदार्थांत ( द्रव्यांत ) आढळून येत. रूप रसादिक पुद्गलाचेच गुण आहेत त्याशिवाय इतर द्रव्यांत म्हणजे जीवादिकांत केव्हांही येवू शकत नाहींत. जितके दृश्यपदार्थ पाहिले जातात, ऐकले जातात, स्वाद घेतले जातात किंवा स्पर्श केले जातात तें सर्व पुद्गल आहेत.

वर्णाद्या वा रागमोहादयो वा ।
भिन्ना भावाः सर्व एवास्य पुंसः ॥
तेनैवान्तस्तत्त्वतः पश्यतोऽमी ।
नो दृष्टाः स्युर्दृष्टमेकं परं स्यात्
कलशा.

भावार्थ— वर्णादिक अथवा रागमोहादिक जे भाव आहेत ते सर्व ह्या पुरुषाचे म्हणजे आत्म्याचे नाहींत. जरी बाह्यदृष्टीनें हे सर्व आत्म्याचे असल्यासारखें दिसतात तरी वास्तविक अंतर्दृष्टीनें पाहणाराला हे सर्व कांहींएक दिसत नाहींत. त्याला केवल ज्ञानघन स्वस्वरूपस्वानुभवगम्य सम्यग्ज्ञानमयी पुरुषच दिसतो.

मालिनी छंदः

सकलमपि विहायाह्नाय चिच्छक्तिरिक्तं ।
स्फुटतरमवगाह्य स्वं च चिच्छक्तिमात्रम् ॥
इममुपरिचरन्तं चारुविश्वस्य साक्षात् ॥
कलयतु परमात्माऽऽत्मानमात्मन्यनन्तम् ॥ १ ॥
कलशा

भावार्थ— हे भव्य आत्मन् ! तूं स्वस्वरूपस्वानुभवगम्य चैतन्याशिवाय जे परभाव त्यापासून रहित म्हणजे भिन्न आहेत त्या सर्वांला स्वभावतःच पर जाणून उघड उघड आपल्या स्वस्वरूपस्वानुभवगम्य ज्ञानमयी चैतन्यगुणांतच तन्मय हो. आणि हे संपूर्ण पदार्थ समूहरूप जो लोक त्याच्यावर राज्य करणारा असा होतत्साता ज्ञाता व दृष्टापणाचा साक्षात अविनाशी असा अनुभव कर. कारण—

॥ अनुष्टुप छन्दः ॥

चिच्छक्तिव्याप्तसर्वस्वसारो जीव इयानयम् ॥
अतोऽतिरिक्ताः सर्वेऽपि भावाः पौद्गलिका अमी ॥

समयसार कलश.

भावार्थः— हा जीव चैतन्य शक्तीनें व्याप्त आहे, म्हणजे ज्ञानघनचैतन्य मात्र आहे. ह्या चैतन्य शक्तीला सोडून जे

भाव आहेत तें सर्व पुद्गलजन्य परभाव आहेत. ह्यावरून एक—दोन, संख्यांत—असंख्यांत, एकांत—अनेकांत, एक—अनेक व द्वैत—अद्वैतापासून अत्यन्त भिन्न एक स्वस्वरूपस्वानुभवगम्य सम्यग्ज्ञानमयी चैतन्य वस्तु चलाचल रहित आहे असे समजा विशेष स्वानुभव पुढील चित्रदृष्टांत द्वारा समजून घ्यावा.

दृष्टांत १ ला — एका मनुष्याचें तोंड पूर्वेकडे आहे व दुसऱ्या एका मनुष्याचें तोंड पश्चिमेकडे आहे. त्या दोघांमध्यें एक दरवाजा आहे. तेव्हां दोघांमध्यें असा वाद उत्पन्न झाला कीं, पूर्वेकडे तोंड असलेला मनुष्य त्या दरवाजाला पूर्वेकडे मानतो व दुसरा पश्चिमेकडे तोंड केलेला त्याच दरवाजाला पश्चिमेकडे मानतो. त्या दोघांचेही मानणें यथार्थ आहे, परंतु परस्परांचा दृष्टिभेद आहे

हें मात्र न समजतां परस्परांत विवाद करतात तो दरवाजा दोघांच्या मध्यें असल्यामुळें आणि परस्परांचा दृष्टिकोण अगदीं एकमेकांच्या उलट म्हणजे एकाचे तोंड पूर्वेला व दुसऱ्याचें पश्चिमेला असें असल्याकारणानें वाद उत्पन्न होणें साहजिक आहे. " जो जसें पहातो त्याला तसेंच दिसतें ,, परंतु त्रयस्तरीतीनें पहा. तुम्ही आपली दृष्टि साफ ठेवून विचार करा. खरोखर तो देखावा कोणत्याही एका दिशेला नसून दिशा दिशेच्या ठिकाणीं व दरवाजा दरवाजाचें ठिकाणींच आहे. त्या दिशेनें किंवा दरवाजानें एकमेकांनीं परस्पराला स्पर्श पण केला नाहीं. दरवाजा व दिशा दोघेही आपआपल्या स्वरूपांत स्वाभाविक जसेंच्या तसेंच स्वभावनिमग्न आहेत. त्याप्रमाणेंच—

दृष्टांत— जीव व पुद्गल हे स्वाभाविक गुणधर्मानें भिन्न आहेत. जसें त्या दरवाजाकडे परस्पर दृष्टीभेदानें पाहणारे दोन मनुष्यें वेगवेगळीं होतीं. तसेंच जीव व पुद्गलरूप दोन वस्तूकडेही पाहणाऱ्या दोन दृष्टि आहेत. एक बहिर्दृष्टि व दुसरी अंतरदृष्टि, एक देह बुद्धि तर दुसरी परमात्मबुद्धि, एक स्वभावदृष्टि दुसरी विभावदृष्टि, एक ज्ञानदृष्टि दुसरी अज्ञान दृष्टि. एक व्यवहारदृष्टि दुसरी निश्चयदृष्टि ह्या प्रमाणें दृष्टीभेदामुळें वस्तूतही भेद दिसतो आणि तें दिसणें ज्याचे त्याचे दृष्टिप्रमाणें बरोबरही आहे. परंतु वास्तविक वस्तूंचे स्वरूप मात्र तसें नाहीं. त्या वस्तूंचा माध्यस्थपणें शांतविचारानें पक्षपात सोडून विचार करावा.

सवैय्या

एक कहूं तो अनेकही दीखत ।

एक अनेक नहीं कछु ऐसो ॥
आदि कहूं तो अंतहीं आवत ।
आदिसु अंतसु मध्यसु कैसो ॥
गुप्त कहूंतो अगुप्तहै कहां ।
गुप्त अगुप्त उभय नहीं ऐसो ॥
जोही कहूंसो है नहीं सुंदर।
है तो सहीपण जैसे को तैसो ॥ १ ॥

भावार्थः—त्या सम्यग्ज्ञान वस्तूला कोणी कसे मानतात. कोणी कसे मानतात ज्याला जसे वाटेल तसे मानू द्या, परंतु वस्तुस्वभाव मुळींच तसा नाहीं स्वभाव अतर्क्य असतो.

॥ चौपाई ॥

॥ ज्ञेयाकार ब्रह्ममल मानै । नाश करणको उद्यम ठानै ॥
वस्तु स्वभाव मिटे नहिं क्योंही । तातें खेद करै सठ योंही।

॥ दोहा ॥

वस्तु विचारत ध्यावतै, मन पावै विश्राम ॥
रसस्वादत सुख ऊपजे, अनुभव ताको नाम १ ॥

अनुभव चिंतामणिरतन, अनुभव है रस कूप ॥
अनुभव मारग मोक्षको, अनुभव मोक्ष स्वरूप ॥ २ ॥

भावार्थः— हे नय, न्याय, एकांत, अनेकांत, निश्चय, व्यवहार, स्याद्वाद प्रमाण नय, निक्षेपादिक जितके आहेत तें सर्व वादविवादाचे विषय आहेत. जो पर्यंत वादविवाद आहे तों पर्यंत वस्तु स्वरूपाचा अनुभव नाहीं. जो पर्यंत अनुभव नाहीं तो पर्यंत मिथ्यात्व आहे आणि जो पर्यंत मिथ्यात्व तो पर्यंत संसार आहे.

चौपाई

सतगुरु कहे सज्जका धंदा।
येह वादविवाद करे सो अंधा ॥ १ ॥

सवैय्या

असंख्यांत लोकप्रमाण जो मिथ्यातभाव,
तेही व्यवहार भाव केवली उक्त है ॥
जिनके मिथ्यात गयो सम्यकदरशभयो,

ठेलियत लीन व्यवहारसे मुकत है ॥ १ ॥

नाटक समयसार.

भावार्थः—ती स्वस्वरूप स्वानुभवगम्य ज्ञानमयी वस्तु तर स्वभावतःच जशीच्या तशी आहे. पहा हस्तांगुलीचित्र किंवा दोघा मनुष्यामध्यें असलेल्या दरवाज्याचे चित्र त्या दोन्हीं चित्रावरून हे स्पष्ट झाले कीं परस्परांच्या दिशाभेदामुळें वस्तूच्या स्वभावात ही भेद वाटतो परंतु वस्तूच्या मूळ स्वभावात भेद मुळींच नाहीं. ती वस्तु स्वभावतःच जेथल्या तेथें जशीच्या तशी चलाचल रहित टंकोत्किर्ण-वत् आहे, परंतु ही गोष्ट देशणालब्धीच्या व सद्गुरूच्या अभावामुळें जीवात्म्याचे ठिकाणी पूर्ण-पणें अनुभवात उतरत नाहीं. तथापि अनु-भवी सद्गुरूच्या उपदेशानुसार स्वतःला असे जाणावें कीं, " स्वस्वरूपस्वानुभवगम्य सम्यग्ज्ञानमयी सर्व जशाचा तसाच आहे

# चित्रहस्तांगुली यंत्र.

स्वस्वरूपस्वानुभवगम्य
सम्यग्ज्ञानमयी स्वभाव
सूर्यवस्तु स्वभावांत ज-
शी आहे तशीच आहे.
स्वभवांत तर्कांचा अभाव
मूळचाच आहे. या सूर्या
चा प्रकाश सर्व चित्रहस्तां
गुलीवर आहे.

पूर्वदिशा
अभोक्ता
अनेक
व्यवहार
मुक्त
अस्ति
दक्षिणादि
अभाव
अंत
आधार
उत्तरदिशा
भाव
आदि
निराकार
अकर्ता
अजीव
शून्य

तोच मी आहे " असे स्वतःचे मनानें किंवा गुरुपदेशानें अचल निष्कंप खात्री करून घ्यावी नंतर मौन सहित एकांतात बसून दोघांच्यामध्यें असलेल्या दृष्टांतचित्रा-कडे पहा? एकाग्रदृष्टीनें पहा? नुसते वरवरून न पहातां आंत पहा, ह्मणजे अंतरदृष्टीनें पहा? कोणत्याही तऱ्हेची अपेक्षा किंवा दृष्टिकोण न ठेवता तिऱ्हाईतपणें पहा? म्हणजे ती स्वस्वरूपस्वानुभवगम्य सम्यग्ज्ञानमयी वस्तु स्वभावतःच स्वतःमध्येंच तन्मय असलेली दिसेल. त्याप्रमाणें आपणही व्यवहार किंवा निश्चयानें वस्तूंचे लक्षण जाणून नंतर दोहों-चाही पक्षपात सोडून त्रयस्तपणें विचार करा असे करतां करतांच आपण आपल्या स्वरू-पांत तल्लीन होऊन जाल यातच खरा आनंद आहे. व्यर्थ वादविवादाचे स्तोम माजवून अहंपणाचा घमेंड मारण्यांत मजा नाहीं.

वादविवादादि अहंपणाचें चाळे हे सर्व विभाव परणाति आहे. ही विभाव परणाति म्हणजे नाटकांत सोंग धारण करून जनतेचे मनोरंजन करण्यासारखे आहे; म्हणजे नाटकातील सोंगा-पासून जसे फक्त जनतेचेच मनोरंजन होते त्यांत स्वतःला कांहीं एक आनंद किंवा मनो-रंजन वाटत नाहीं त्याप्रमाणेच संकल्प विक-ल्पात्मक तर्क वितर्करूप वादविवादापासून श्रोत्यांना आनंद वाटेल परन्तु स्वतःला त्यांत किंचित देखील आनंद वाटणार नाहीं. जसें नाटक पहाण्यांत आनंद आहे तसें ज्ञाता दृष्टा होण्यातच आनंद आहे [ स्वभाव परणतींत आनंद आहे. )

सवैय्या

सम्यग्ज्ञान स्वभावसे सदा भिन्न अज्ञान।
धर्मदासक्षुल्लक कहै प्रेमचंद तूं मान ॥ १ ॥

चित्राऽङ्गुलिकूं देखकें मनमें करो विचार ।
धर्मदासक्षुल्लक कहै पावेंगा भवपार ॥ २ ॥

आतां स्वस्वरूप स्वानुभव असा घ्यावा कीं, एकाच वस्तूला एक नयाने दुष्ट म्हणजे द्वेषी ( विपक्षी ) आणि तीच एक वस्तु दुसऱ्या नयानें द्वेषी म्हणजे दुष्ट ( विपक्षी ) नाहीं अशा प्रकारे स्वस्वरूप चैतन्याविषयीं दोन नयाचे दोन दृष्टीकोण किंवा दोन अपेक्षा अथवा विवक्षा अर्थात् पक्षपात आहेत. जसें:— त्या केवलचैतन्यस्वरूपाला एक नय कर्ता तर दुसरा नय अकर्ता, एक नयानें भोक्ता तर दुसऱ्या नयानें अभोक्ता, एक नयानें जीव तर दुसरें नयानें अजीव, एक नयानें सूक्ष्म तर दुसरे नयानें स्थूल, एक नयानें हेतु तर दुसरें नयानें अहेतु, एक नयानें कार्य तर दुसरें नयानें अकार्य, एक नयानें वेद्य तर दुसरें

नयानें अवेद्य, एक नयानें भाव म्हणजे सध्या प्रत्यक्ष तर दुसऱ्या नयानें अप्रत्यक्ष अशा प्रकारें चैतन्याविषयीं दोन्हीं नयाचे स्वाभाविकच दृष्टिकोण किंवा दृष्टिभेद वेगवेगळे आहेत. तथापि जे तत्वज्ञानी असतात तें स्वस्वरूपस्वानुभवगम्य वस्तूचा विकल्पात्मक अनुभव न करणारें असल्या कारणानें ते चिन्मात्रच असतात म्हणजे त्रयस्थपणें ज्ञातादृष्टाच असतात अर्थात् आपल्या स्वभावांत रंगण्याचे सोडून पक्षपातानें विभावांत रंगत नाहीं.

जसें:— सूर्य व प्रकाश एकच आहे त्याप्रमाणें स्वभाव आणि विभावाला एकच मानीत नाहीं अर्थात् सूर्य आणि अंधःकार स्वाभाविकच भिन्न आहे, तसें स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञानमयी स्वभावसूर्य व अंधःकाररूप विधि-निषेध, अस्ति—नास्ति

राग—द्वेष, वैर—विरोध, पक्षपात म्हणजे द्वैत—अद्वैत, संकल्प—विकल्प किंवा लोक—अलोक, आकार—निराकार, शून्याशून्य अथवा तन, मन, वचनादिक एकतन्मयी नाहींत. जसें सूर्य प्रकाशांशीं लहान—मोठा, विद्वान्—अविद्वान्, भोग—योग, जन्म-मरण, सज्जन-दुर्जन, मौनी-वाचाळ, अंधळा-डोळस, पाप—पुण्य, उत्तम—नीच, कर्ता-अकर्ता, चल-अचल, धर्मी-अधर्मी, क्रोध-क्षमा, बंध-मुक्त वगैरेंचा संबंध नसतो, तो सूर्य ह्या जगांतील पदार्थाला प्रकाशतो, त्याप्रमाणेंच स्वस्वरूपचैतन्यज्ञानघन आहे, म्हणजे सूर्याप्रमाणेंच लोकालोकांतील सर्व ज्ञेयपदार्थाला पहातो-जाणतो किंवा प्रकाशतो. जास्त काय सांगावें, तीं चैतन्यजोत सूर्यप्रकाशाला आणि अमावास्येच्या अंधारी रात्रीला पण प्रकाशते. ( सूर्याप्रमाणेंच तयरथ पणें प्रकाशते. ) सूर्य जसा जगांतील सर्व

वस्तूला प्रकाशतो परंतु त्या वस्तूंशीं केव्हांही तन्मय होत नाहीं. किंवा जगांतील वस्तूच्या घडामोडीनें (उत्पादव्ययध्रौव्यानें) आपण स्वतः आकुलित-दुःखी सुखी होत नाहीं तसाच स्वस्वरूपस्वानुभवगम्य आत्मा पूर्वोक्त परस्पर विरोधी सर्व गोष्टीला म्हणजे स्वभाव परणतीला व विभाव-परणतीला जाणतो परंतु आपला स्वतःचा स्वभाव सोडून विभावरूप होत नाहीं म्हणजे प्रत्येक द्रव्य जरी परिणामी आहे. ते परिणाम उत्पादव्ययध्रौव्यात्मक असतात, तथापि ते ज्या द्रव्याचे होतात ते त्याचेच गुणधर्म आहेत. जसें ज्ञेय म्हणजे घटपट वगैरे आणि ज्ञान म्हणजे चैतन्य. ज्ञेय पदार्थ हा ज्ञनाचा विषय आहे. आतां ज्ञेय म्हणजे घट घ्या व विचार करा प्रथम अवस्थेत तो घट पिंडरूप होता. आतां त्याचे परिणमन घटरूपानें झाले,

नंतर कांहीं निमित्तानें तो फुटला हे सर्व परिणमन एका मृत्तिकेचेच झाले. पटाचे किंवा इतर पदार्थांचेच झाले नाहीं. पिंडाचा नाश ज्या क्षणीं त्याच क्षणीं घटाची उत्पत्ति आणि घटाचा नाश ज्या क्षणीं त्याच क्षणीं उत्तर अवस्थेचा उत्पाद परन्तु त्या सर्व अवस्थेंत मृत्तिकेचें ध्रौव्यत्व कायम. हें झालें ज्ञेयाबद्दल, आतां ज्ञानाबद्दल विचार करा. ज्ञानांत ज्यावेळीं घटाचा अभाव होता त्यावेळीं मृत्तिकापिंडाचा सद्भाव होता. त्याच ज्ञानांत मृत्तिकेचा अभाव ज्या क्षणीं त्याच क्षणीं घटाची उत्पत्ति आणि ज्यावेळीं घटाचा नाश त्याच वेळीं पुनः त्याच ज्ञानांत सामान्यमृत्तिकेचें ध्रौव्यत्व कायम. असें ज्ञानांत सुद्धां पारिणामिकत्व, उत्पादव्ययध्रौव्यत्व सिद्ध होतें, तरी ते त्यांचेच स्वभाव आहेत. त्याला विभाव मानूं नये. "ज्ञेयाच्या परिणामिपणामुळें

ज्ञानांतही परिणामित्व होणारच. ,,

दृष्टांत— जसें एका मोठ्या आर त समोर असलेल्या वस्तूचे रंगविरंग किंवा नाना प्रकारचे आकार दिसणारच. त्याप्रमाणेंच ज्ञानांत पण ज्ञेयपदार्थांचे रंगविरंग, रूप विकार, क्रोध, मान, माया, लोभ, पुण्य पाप, आदि शुभाशुभ जितके म्हणून प्रकार आहेत तें सर्व दिसणारच. " ज्ञेयपदार्थ व त्याचे पर्याय ज्ञानांत दिसणें हाच दोघांचा स्वभाव-धर्म आहे. ह्यामुळेंच एकमेकांना महत्व प्राप्त झालें आहे. हा परस्पराचा परस्परा-वर मोठा उपकार आहे. ,,

जसें त्या आरशांत दिसणारे प्रतिबिंबित पदार्थांचे रंग बेरंग नानातऱ्हेचे आकारादि आरशाशीं तन्मय झाल्यासारखे दिसतात तरी तन्मय होत नाहीं पदार्थ आपल्या रंग बेरंग आदि स्वभावतच तन्मय असतां व आरसा आपल्या

गुणात तल्लीन असतो. त्याचप्रमाणें स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञामयी आर-शांत हे गति, स्त्री, पुरुष, नपुंसक अथवा तन, मन, वचनादिचा शुभाशुभ व्यवहार किंवा त्याचे सुखदु:खात्मक फळाचे प्रतिबिंब झळकते जसे आरशाच्या स्वच्छता गुणामुळें समोरील वस्तूचे प्रतिबिंब पडते तसेच आत्म्याच्या ज्ञान गुणांत लोकाऽलोकातील ज्ञेय पदार्थ व त्याचे सर्व पर्याय प्रतिबिंबित होतात, त्या-मुळें आपणांस अनादिकाळाच्या अविद्येच्या संस्कारामुळें असे भासते कीं, उपरोक्त सर्व वस्तू त्या आरशांत जणू कीं काय खिळूनच गेल्या किंवा तन्मय झाल्या अथवा एखाद्या कुशल चित्रकारानें त्या वस्तू त्या आरशांतच खोदल्या कीं काय कोण जाणे असा भास होतो तोच तो मिथ्याभास आहे. वास्तविक आरसा व हे प्रतिबिंबित पदार्थ केव्हां एक होत नाहीत

ते आपल्या ठिकाणींच [स्वभावांतच] असतात तसेंच ज्ञान व ज्ञेय केव्हांही एक होत नाहींत जे ते आपल्या स्वभावाला सोडीत नाहींत परंतु स्वभाव सोडून परस्वभावरूप झाल्या सारखें वाटतें तें अज्ञान आहे. मिथ्यात्व आहे तें अज्ञान व स्वभावतःच जड अज्ञानमय आहे. त्या अज्ञानाला किंवा जडाला फक्त एक ज्ञानच जाणतें. ही अपूर्व गुरुकिल्ली सद्गुरूच्या कृपाप्रसादाशिवाय किंवा काललब्धि आल्याशिवाय स्वस्वरूपसम्यग्ज्ञानाचा लाभ होणार नाहीं. ऐका? जसा सूर्यांत प्रकाश गुण तन्मयी आहे तसा ज्या वस्तूंत ज्ञान गुण आहे त्या वस्तूला मुनि, ऋषी, आचार्यगणधरादि ' देव किंवा जीव , असें म्हणतात तो निश्चयानें ( स्वभावदृष्टीनें ) जीवाशीं तन्मयच आहे. ऐका ? निश्चयदृष्टि [ तात्विकदृष्टि ] मध्यें परस्पर जाति भेद नाहीं, स्वभाव भेद नाहीं. नाम

भेद नाहीं अर्थात् " गुण गुणी अभेद,, म्हणून जीव राशींत परस्पर भेद नाहीं. जर कथंचितप्रकारें भेद कराल तर तो भेद स्वाभाविक नाहीं. पर वस्तूच्या [ अज्ञानाच्या किंवा मोहाच्या अथवा अविद्येच्या ] संयोगामुळें वाटतो. दृष्टांतः— जसें स्वच्छ आरशांत किंवा स्फटिकांत समोरील वस्तूचे रंग किंवा आकारादि प्रतिबिंबित होतात त्याला पाहून आरशाला किंवा स्फटिकाला जसें रंगे बेरंगी आकाराचें मानणें किंवा बोलणें त्याचे कारण स्फटिक आणि आरसा व त्याच्यासमोर असलेल्या वस्तूंच्या स्वरूपाचे अज्ञानच होय. अज्ञानदृष्टीनें म्हणजे ज्याला दोन्हीं वस्तूचें खरें स्वरूप ठाऊक नाहीं त्यानें तसें मानणें बरोबरच आहे परंतु असे मात्र समजू नका कीं, वास्तविक वस्तू स्वभावच तसा आहे. ज्ञानदृष्टीनें पहा!

म्हणजे खरे काय ते दिसेल. हे मत वाले हो वैशेषिक मतवाले हो! वैष्णव मत वाले हो! शैव मत वाले हो। बौद्ध मत वाले हो, सांख्य मत वाले हो, मीमांसक मत वाले हो, आपण पक्ष भेदाने अंधळे झाल्यामुळें हत्तीला पहाणाऱ्या जन्मांध सहा आंधळ्याप्रमाणें आपआपसात वादविवादाचे बंड माजवू नका?

हे मत मतांतर वाले हो; त्या सहा जन्मांध प्राण्याप्रमाणें हत्तीच्या एकाएका अवयवावरून संपूर्णपणें हत्तीची कल्पना करू नका? व आपल्या अज्ञानाचे प्रदर्शन वितंड वादानें करूं नका? आगमप्रमाण सद्गुरुप्रमाण जें तत्व प्रतिपादित असेल तेच प्रमाण आहे असें हें मतमतांतर वाले मित्रांनो! तुम्ही समजा.

दोहा

समजो समजो समजमैं समजो निश्चय सार।
धर्मदासक्षुल्लक कहे तब पावो भवपार॥

हा सर्व उपदेश सद्भूतव्यवहाराचा समजावा.

इति चित्रद्वार वचनिका संपूर्ण.



# अथ ज्ञानावरणकर्म

| | | |
|---|---|---|
| १ | मति | ज्ञान |
| २ | श्रुत | ,, |
| ३ | अवधि | ,, |
| ४ | मनःपर्यय | ,, |
| ५ | केवल | ,, |
| ३ | कुमति | ,, |
| ७ | कुश्रुति | ,, |
| ८ | कुअवधि | ,, |

दोहा

ज्ञानावरणी घातकें हुवो ज्ञानको ज्ञान ॥
धर्मदासक्षुल्लक कहे जिन आगम परमान ॥ १ ॥

## अथ वचनिका

जसें एखाद्या मूर्तिपुढें पडदा सोडला तर त्या मूर्तीचे अंगप्रत्यंग आपणांस दिसत नाहीं त्याप्रमाणेंच ज्ञानघन आत्म्यामधें पडद्याप्रमाणें एक काळेकुट असे कर्मरूप आवरण

( आच्छादन ) येतें. तेव्हां आपली स्वभावदृष्टि सुटून विभावदृष्टि होते म्हणजे आपले खरें स्वरूपाचें ज्ञान अपणांस [ बाह्यदृष्टीत ] पटत नाहीं किंवा होत नाहीं. जसें सूर्यापुढे मेघपटल आडवे आलें असतां सूर्यज्ञान होत नाहीं तसेंच केवलज्ञानभानुपुढें मेघपटलाप्रमाणें ज्ञानाला आच्छादून टाकणारे असें एक कर्मपिंड आडवे येतें म्हणून ज्ञानस्वरूप मूर्ति आपणांस दिसत नाहीं.

आतां विचार करा सूर्यापुढें मेघपटल किंवा मूर्तिपुढें वस्त्राच्छादन जरी आडवे येतें तरी सूर्यांत स्वतःमध्यें किंवा मूर्तीत स्वाभाविक कांही फरक पडतो कीं काय, वरवर पाहाणाराला असें वाटेल कीं; त्या मेघ पटलामुळें सृष्टि प्रकाशमान् झाली नाहीं किंवा पडद्यामुळें मूर्ति दिसली नाहीं परंतु खोल दृष्टीनें विचार केला असतां आपणांस असें स्पष्ट

वाटेल कीं, जे आपणांस सूर्य—ज्ञान झालें नाहीं किंवा मूर्तिज्ञान होत नाहीं तें सर्व आपल्या स्थूल बुद्धिमुळें दिसत नाहीं सूर्या पुढें मेघपट नेहमी आडवे येणार जाणार परंतु सूर्य तो स्वाभाविकच प्रकामान् आहे. आणि मेघपटल पण स्वाभाविकच काळेकुट्ट अधंःकारमय आहेत दोघेही आपआपल्या स्वरूपांतच अचल असतात सूर्य किंवा मेघ—पटल आपल्या नैसर्गिक स्वभाला सोडण्यास असमर्थ असतात. हा ही पण परस्परांचा स्वाभाविक धर्मच आहे, परंतु आणखी थोडा जास्त विचार करा! सूर्यापुढें मेघपटल आडवे आले आणि अंधार पडला वगैरे गोष्टीचे ज्ञान आपणांस कशामुळें झालें काळेकुट्ट मेघामुळें कीं; सूर्याच्या स्वपरप्रकाशगुणामुळें, जर मेघा—मुळें झालें म्हणाल तर मेघ स्वाभाविकच काळे-कुट्ट असतात त्यांत प्रकाशगुण मुळींच नाहीं.

प्रकाश गुण स्वाभाविक सूर्यातेच आहे तसें जर नसते तर अमावास्येच्या रात्रीं पुष्कळ मेघ आकाशांतून विहार करतात परंतु आपणांस काय दिसते तर निबिड अंधार. अर्थात् जरी सूर्यापुढें मेघपटळ आडवे आले तरी त्याच्या स्वभावांत तिळभर देखील कमीजास्तपणा येत नाहीं, परंतु तो आपल्या प्रकाशानें उलट त्या मेघ पटलाला पण प्रकाशतो ह्मणजे तो स्वपर-प्रकाशक आहे.

उपरोक्तदृष्टांताप्रमाणेंच:—स्वस्वरूपरवा-नुभवगम्य अशा एक चैतन्यमयी स्वपरप्रकाशक ज्ञानघन सूर्य किंवा मूर्ति आहे. त्यापुढें मेघपट-लाप्रमाणें ज्ञानशून्य, जड व अंधःकारमय असें कर्मपिंड आहे. असे जरी आहे तरी सूर्य जसा आपल्या स्वभावगुणांत राहून मेघपट-लाला पण प्रकाशतो. तद्वत् ती चैतन्य मूर्ति आपल्या स्वभावगुणांतच राहून अज्ञानरूप

कर्माला पण जाणते-प्रकाशते. कारण कर्म पौद्गलिक ज्ञेयपिंड आहे. चैतन्य ज्ञानमूर्ति आहे अज्ञानाला पण ज्ञानच जाणते, सूर्यप्रकाशा-शिवाय अंधाऱ्या रात्रीं मेघपटलाचा कसा बोध व्हावा अर्थात् होत नाहीं त्याचप्रमाणेंच ज्ञाना-शिवाय अथवा चैतन्याशिवाय अज्ञानस्वरूप कर्मा-ला कोण जाणतें अर्थात् अज्ञानाला पण ज्ञानच जाणतें. जरी अज्ञानाला ज्ञान जाणतें तरी तें अज्ञानरूप होत नाहीं ह्यावरून ही गोष्ट लक्षांत घ्या कीं, अज्ञान केव्हांही ज्ञानरूप होत नाहीं व ज्ञान पण अज्ञानरूप होत नाहीं अज्ञान तें अज्ञानच व ज्ञान तें ज्ञानच राहतें हा नियम त्रिकालाबाधित आहे.

स्वस्वरूपस्वानुभवसम्यग्ज्ञानमयी चैतन्य मूर्तींत आणि ज्ञानावरणीयकर्मांत स्वाभाविकच जमीनअस्मानाचा भेद आहे. कारण चैतन्य-मूर्तीही ज्ञानघन आहे व ज्ञानावरणीयकर्म जड

अज्ञानमय आहे. परस्परांत लक्ष्य लक्षणभेद आहे. वास्तविक वस्तुस्वभाव परस्पर भिन्न जरी आहे तरी तसें आपणांस वाटत नाहीं. त्याचें कारण आपली दृष्टीच अविद्येच्या संस्कारामुळें विकारी झाली. विकारयुक्त दृष्टीमुळें आपणांस तसें दिसतें, हा गुन्हा त्या वस्तूचा नसून आपल्या दृष्टीचा आहे. अशी विकारी दृष्टि होण्याचें कारण अनादिकालीन काललब्धीच्या अभावी किंवा सद्गुरूच्या अभावी आपल्या मनां वर जे कुसंस्कार किंवा मिथ्यासंस्कार—अनात्म-दृष्टि, बहिर्दृष्टि—व्यवहारदृष्टि किंवा देहात्म-बुद्धि वगैरेमुळें वस्तूचें विपरीत स्वरूप भासतें. परंतु आपल्या विकारी दृष्टीमुळें मात्र मूळ वस्तुस्वभावांत कांहीं विकार घडतो किंवा असतो असें मानाल तर तें मात्र मिथ्या आहे. कारण आपल्या विकारी दृष्टीमुळें आपणास वस्तुस्वभावांत विकार दिसतो, तें

जरी आपल्या दृष्टीनें बरोबर आहे तरी वास्तविक वस्तुस्वभाव तसा नाहीं. कारण वस्तूकडे पहाण्याच्या प्रत्येकाच्या अनेक दृष्टि आहेत. जो ज्या दृष्टीनें त्या वस्तूकडे पाहील त्याला ती तसी दिसेल तरी नानातऱ्हेच्या दृष्टि भेदामुळें वस्तु स्वरूपांत मात्र भेद मुळींच होत नाहीं.

आतां हे सज्जनहो! पंचप्रकार जे ज्ञानावरणादिककर्म त्याचा विचार करा कीं, चैतन्य स्वरूपज्ञानाचा व जडस्वरूप पौद्गलिकज्ञानावरणादिककर्माचा कसा काय संबंध आहे.

दोहा

प्रकाश सूरज एक है जड चेतन नाहीं एक ॥
धर्मदासक्षुल्लक कहे मनमें धार विवेक ॥ १ ॥

इति ज्ञानावरणकर्म चित्र यंत्र समाप्तः

# अथ दर्शनावरणकर्म

| | | |
|---|---|---|
| १ | चक्षु | दर्शन |
| २ | अचक्षु | ,, |
| ३ | अवधि | ,, |
| ४ | केवल | ,, |

## सोरठ

ज्ञानभानु जिनराज, सर्व गतके ऊपरे ॥
धर्मदास कहै सार, मोही सुखको साज है ॥१॥

## अथ वचनिका

ज्या प्रमाणें सूर्य जगांतील संपूर्ण प्रकाश-मान्वस्तूंला प्रकाशतो त्याप्रमाणेंच ज्ञानभानु [ सूर्य ] अलोकांसहित त्रिलोकाला पहातो परंतु अनादिकालाच्या अज्ञान बहिरात्म्याला आपलें खरें स्वस्वरूप पाहूं देत नाहीं तेंच तें दर्शनावरणकर्म होय.

जसें:— एका महालांत अनेक वस्तूंचे

प्रदर्शन आहे, व तें पहाण्याची शक्ति ( डोळे ) एका माणसांत आहेत परंतु द्वारपाल पासशिवाय [ हुकमाशिवाय ] आंत जावूं देत नाहीं. तसेच जीवामध्यें पहाण्याची शक्ति स्वभावतःच आहे परंतु दर्शनावरणरूप द्वारपाल त्या जीवाला अंतर्दृष्टीरूप पासा शिवाय स्वस्वरूप रूप महालांत दर्शनावरणरूपी द्वारपाल प्रवेश करूं देत नाहीं ( अंतरदृष्टी होऊं देत नाहीं ) येथें असा विचार करा कीं, द्वारपाल त्या पाहाणारास म्हणतो की, महालांत काय पहावयाचें आहे

उत्तर— ज्यामध्यें पहाण्याचा गुण आहे त्या अमोल्य वस्तूला पहाण्याची फार दिवसाचें तीव्र इच्छा आहे. तेव्हां द्वारपाल पुनः उत्तर देतो कीं, विनाकारण केविलवाणी होऊं नका कारण तुम्ही जगांतील संपूर्ण चराचर वस्तूल

पाहिलें कीं नाहीं, जर पाहिलें, तर आंत त्या-पेक्षां विशेष असें काम आहे. जगांतील नाना वस्तूंचेच प्रतिरूपक आहे. त्याशिवाय कांहीं-एक नाहीं. अहो ह्या पदार्थसंग्रहालयाला पाहण्याची मजा अज्ञानी-जगांतील वस्तूंचे तारत-म्यज्ञानरहित अशा माणसाला तो तुमच्या सार-ख्या शहाण्या व अनुभवी माणसांना कसा वाटेल. आणि दुसरी गोष्ट ऐका ! जो वाटेल तो आंत प्रवेश करील म्हणाल तर तसें नाहीं बरें ! मी दर्शनावरणीय नामक द्वारपाल आहे. आम्हाला अंतर्दृष्टिरूप पास ज्याचे जवळ आहे त्यालाच सोडतां येतें. इतरांना मज्जाव आहे.

प्रेक्षकांचा प्रश्न— तो पास कोठें मिळतो ?

उ.- सद्गुरूजवळ. प्रश्न—सद्गुरु न भेटला तर ?

उ.- मग फार कठीण--अत्यंत दुर्लभ आहे. तरी निराश होऊं नका, आंत जाऊन पाहाण्या-ची तीव्रेच्छाच जर असेल तर दुसरा एक उपाय

आहे परंतु तो फार कठिण, अत्यंत चिकाटीच आहे. तो असा :— त्या पलीकडच्या खोलीत पुष्कळ कपाटें आहेत. त्यामध्यें नानाप्रकारची पुस्तकें [ शास्त्रें ] आहेत. त्या मध्यें एक अध्यात्मशास्त्र आहे. त्या शास्त्रांत आपणास जो पास हवा तोच सांपडेल. परंतु सांभाळून जा. आमचे वरचा अधिकारी त्या पासाचे रखवालीं करतो तो फार खविस असून दूराग्रही आहे. त्याचें नांव मोहनीय कर्म आहे. त्याचा पोषाख फार सुंदर असून तो स्वतःच फार मोहक आहे. त्याची दृष्टि जर एखाद्यावर पडली तर तो पूर्णपणें वेडाच झाला पाहिजे, असा त्याचा प्रताप आहे. मग कुठला पास नि कुठलें काय. आणि इतक्या ऊपर जर तुझ्या दैवानें किंवा पूर्व-पुण्याईनें उच्चलच खाली असेल तर तूं मोहाच्या दृष्टीस पडण्यापूर्वींच सगळ्या

जगाचा त्राता आणि कल्याणकारी अशा सद्गुरूची भेट घेशील तर मग मात्र तुझें काम आपोआप अनायासेच झालें म्हणून समज. बाबारे ! असें तुला मार्ग दाखविलें. या ऊपर तुझी भवितव्यता.

दृष्टांत २ रा— एक अग्नि राखेंत झांकलेला आहे व एक अग्नि राखेशिवाय आहे. त्याप्रमाणेंच त्या महालांतील ज्ञानदर्शनघनवस्तूंत व तुझ्यांत अंतर समज. खरें पाहिलें तर जसें राखेशिवाय अग्नींत जे जे गुण आहेत तेच गुण राखेनें झांकलेल्या अग्नींत आहेत. परंतु वरवर पाहाणारास भेद वाटतो, तसाच तुझ्यांत व त्या ज्ञानदर्शनघनवस्तूंत तुला फरक वाटतो, परंतु तो वास्तविक तसा नाहीं. हें सर्व दृष्टिभेदामुळें भासतें.

( ) महाराज, आपलें सांगणें सगळें खरें, परन्तु त्या महालांतील ज्ञाताद्रष्टा, वस्तु व

माझ्यांत साम्यता ती कशी हे अद्याप पटलें नाहीं तें कृपाकरून सांगा. अरे बाबारे ऐक.

प्रश्न— त्या महालांत कोण आहे ?

उत्तर— ज्ञाताद्दष्टा.

प्रश्न— तुझी इच्छा काय आहे ?

उत्तर— स्वामिन्, त्या ज्ञाताद्दष्टाला पहाण्याची व जाणण्याची आहे.

प्र.— पहाणें, जाणणें ह्याचा अर्थ काय ?

उत्तर— ज्ञाताद्दष्टा.

प्रश्न— मग ज्याला पहाण्याची जाणण्याची इच्छा आहे असा तूं व तो ज्ञाताद्दष्टा ह्यामध्यें काय अंतर आहे ?

हे शिष्या! इच्छा, वासना, मनीशा हे सर्व मनोविकार आहेत. तें स्वतः अज्ञान व जडरूप असल्यामुळें ज्ञाताद्दष्टा होऊं शकत नाहींत. तूं स्वरूप ओळखिलें नाहीं म्हणून असा चिदाभासाच्या मागें धावतोस. आतां

या उपर असें तर्कवितर्क सोडून स्वरूप जाण.

आणखी थोडें ऐक ! ह्या दरवाजांत कांहीं तरी एक आवाज मोठ्यानें कर. तेव्हां त्यानें गुरुआज्ञाप्रमाणें मोठ्यानें असा आवाज केला कीं, ' तूं कोण आहेस , तेव्हां प्रतिध्वनि आला कीं, ' तूं कोण आहेस , तेव्हां त्यानें पुनः आवाज दिला कीं, मीच आहे; तेव्हां पुनः प्रतिध्वनि आला कीं, " मीच आहे ,, तेव्हां त्याची खात्री पटली कीं, त्या मीत व माझ्या मीत कांहीं एक फरक नाहीं.

तेव्हां शिष्य म्हणाला हे स्वामिन्, माझाच आवाज परत मला ऐकूं येतो. तेव्हां गुरू म्हणाले हे शिष्या, जसा तुझाच आवाज तुला ऐकूं येतो, तसाच तुझा तूंच ज्ञातादृष्टा आहेस. तूंच जगांतील सर्व चराचरवस्तूला पहातो जाणतो.

प्रश्न— तूं स्वतः नसलास तर त्या महा लातील ज्ञाताद्रष्टाला कोण पाहील ?

उत्तरः— गुरूजी मी नसलों तर त्या ज्ञाताद्रष्ट्याला कसें आणि कोणी पहावे मग मीच ज्ञाता द्रष्टा ठरलों तर स्वामीन् काय शरमेची गोष्ट आहे कीं, माझा मीच ज्ञाताद्रष्टा असतांना इतरत्र ज्ञाता द्रष्टा शोधीत होतो. किती हे अज्ञान, आतां पर्यन्तच्या मूर्खत्वामुळें मला फार शरम वाटतें गुरूजी उत्तरतात हे प्रिय शिष्या ह्यांत शरमण्यासारखी कांहीं एक गोष्ट नाहीं, परंतु वेळीच सावध झालास आणि स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञान प्राप्त करून घेतलेस ही गोष्ट फार आनंदाची व महत्वाची केलीस " ह्या जगांत अज्ञानी लोकांचाच भरणा पुष्कळ असल्यामुळें जगांत दुःख व कष्ट दिसते ,, तरी इतःपर त्यापासून बचावून

फार सावधानतेनें स्वस्वरूपाकडे लक्ष ठेवून वाग व आपले हित कर.

शिष्य उत्तरतो कीं; हे स्वामिन्, खरोखर आपण तरणतारण आहांत. आतां आपल्या वरद्हस्तामुळें माझ्या पूर्णपणें लक्षांत आलें कीं सूर्य जसा स्वतःला व सर्व जगाला पहातो, तसाच मी स्वतःला व सर्व जगालाच काय परन्तु सर्व जगाला प्रकाशणाऱ्या सूर्याला पण मीच पहातो. माझ्यापुढें कोटी सूर्यांचें तेज फिकें वाटतें, हीच आपली अमोल्य कृपा.

आतां मला जगांत पहाण्यासारखें काय राहिलें आहे. आजपर्यंत मी जगांत होतो, परन्तु आतां सर्व त्रैलोक्य माझ्यांत आहे.

गुरुजी आतांपर्यंत त्या दर्शनावरण नामक द्वारपालानें काय आडवून आणलें होतें. खरो-खर त्यानें आजपर्यंत जगांतील किती जणांना नाडले असेल व आपण किती जणांना तारले

असेल. आपल्या दयाळूपणाची काय थोरवी गावी ?

दोहा—

दर्शन.वर्णि कर्मको प्रगट दिखायो भेद ।
गुरु विन तो ना मिलै बहुत करो तुम खेद ॥

भावार्थ— ज्याप्रमाणें सूर्यांत प्रकाशगुण आहे त्याप्रमाणें ज्या वस्तूंत पहाण्याजाणण्याचा गुण आहे, त्या वस्तूचें नांव दर्शनगुण आहे. त्या दर्शनाचे आरंभीं दाखविलेले चार भेद पराच्या अपेक्षेनें दिसतात, परंतु दर्शन तर स्वभावाला सोडून चक्षु अचक्षु होत नाहीं, म्हणजे दर्शन पराची अपेक्षा मुळिं ठेवत नाहीं, ते स्वतःच दर्शनमय आहे म्हणूनच ते स्वतः स्वतःप्रमाणेंच पराला पण दर्शवितें,

दृष्टांत— जसें जन्मांध मनुष्य आपले स्वतःचे अंग पण पाहूं शकत नाहीं, तसेंच जड असे चक्षु, अचक्षु, आदि अज्ञानमयी

वस्तू स्वतःला व ज्ञानदर्शनाला जाणीत नाहीं. परंतु ह्याचे उलट एका सडकेवर एक घर आहे त्या घरांत समोरच्या खोलींत अंधारांत एक डोळस मनुष्य बसला आहे तो स्वतःला सडकेवरून जाणाऱ्या येणाऱ्या व्यक्तीला आणि सडकेवरच्या प्रकाशाला त्याचप्रमाणें खोलींतील गाढ अंधाराला पण पहातो तसें दर्शन आहे ते स्वपराला जाणतें. जसें सूर्य व प्रकाश अभिन्न आहे तसें दर्शन व पहाणें हें अभिन्न आहे.

॥ इति दर्शनावरण वचनिका संपूर्ण ॥

## अथ वेदनीय कर्म

| | |
|---|---|
| साता | वेदनी |
| असाता | वेदनी |

दोहा

विषय सुख सो दुःख है निश्चयनय प्रमाण ॥
धर्मदासक्षुल्लक कहे समज देख मतिमान् ॥ १ ॥

भावार्थः—हे बुद्धिमान् शिष्या, सांसारिक विषयसुख हें खरोखर दुःखरूपच आहे परंतु मोहनीयकर्मामुळें निर्बुद्ध होऊन मृगजलाप्रमाणें दुःखालाच सुख मानून अनंत संसारी होत आहेस आतां तरी सावध हो!

वेदनीय कर्म दोन प्रकारचें आहे. एक साता व दुसरें असाता, दोन्ही दुःखरूपच आहेत जसे दृष्टान्तः—तरवारीच्या धारेला मध माखलेला आहे. एक मनुष्य त्याचा पुढचा परिणाम न जाणतां त्या तरवारीची धारच मधाच्या गोडीमुळें चाटीत आहे परंतु आरंभीं असलेली गोडी दुःखमूलक आहे ही गोष्ट तो जाणत नाहीं. मधाच्या गोडीमुळेंच आपलें हिताहित जाणत नाहीं. तसे ज्याला आपले स्वस्वरूपानुभव नाहीं तो प्राणी हिताहित न जाणल्यामुळें सुखदुःख भोगतो. येथें स्वस्वरूप स्वानुभव असा घ्यावा कीं; दृष्टांतः—

वेदनीय कर्म



जसें भूमंडळापासून अत्यंत दूर असा सूर्य किंवा भूमंडलांत व भूमंडलाच्या बाहेरही सर्वत्र व्यापक असें आकाश आहे आतां विचारा कीं; ह्या भूमंडळावर सर्वत्र साम्राज्य सूर्याचें आहे व तो भूमंडलांतील जीं नाना सुखदुःखें जाणतो-पहातो परंतु तो कधीं स्वतः सुख किंवा दुःखरूप होतो काय? अथवा दूर असा सूर्य सोडून दिला तरी सर्वत्र व्यापक असें आकाश घ्या तें सगळ्या जगांतील वस्तूला अवगाहनत्व हा आपला स्वभाव सोडून कधीतरी दुःखी किंवा सुखी झालेलें दिसतें काय ? नाहींना ! मग तुम्ही वेदनीयकर्माच्या उदयामुळें जें सुख किंवा दुःख भोगतां म्हणजे काय करतां सुर्यप्रकाशाप्रमाणें किंवा आकाशा-प्रमाणें भिन्नपणें भोगता [ जाणता ] कीं, अगदीं एक तन्मय होऊन जातां. जर सूर्यप्रकाशाप्रमाणें फक्त उदासीनपणें ज्ञाताद्रष्टा

जर म्हणत असाल तर तो तुमचा मूळचा स्वभाव आहे. व तो तसाच अचल राहणार परंतु स्वभाव सोडून तुम्हीं स्वतः सुख दुःख रूप होऊन जाता असे मानाल तर तें तुमचें अज्ञान आहे. कारण तुम्हीं स्वतः चैतन्ययुक्त आहांत व कर्म अचेतन जड आहे तुम्ही स्वाभाविक ज्ञानघन आहांत व कर्म अज्ञानघन आहे. तुम्ही तत्वतः सूर्या· प्रमाणें प्रकाशक आहांत व कर्म भूमंडलाप्रमाणें प्रकाश्य आहे. जसा सूर्य भूमंडलापासून अत्यंत दूर राहून देखील सर्व जगाला प्रकाशतो ( जाणतो किंवा चैतन्य आणतो ) त्याप्रमाणेंच ज्ञानघन आत्मा सुखदुःखात्मक वेदनीय कर्माला प्रकाशतो-जाणतो. सूर्य आणि प्रकाश जसा एक आहे अथवा अंधार आणि काळेपणा जसा एक आहे त्याप्रमाणें वेदनीय कर्म एक नाहीं. [ अंधार ] वेदन म्हणजे जाणणें ( प्रकाश ) आणि कर्म म्हणजे जड अज्ञान

सूर्यांत व अंधारांत, जमीनींत व अस्मानांत जो भेद आहे तोच भेद वेदनीयकर्मांत व तुमच्यांत आहे. हे उपरोक्त जसें एकमेकास स्पर्श पण करूं शकत नाहींत, त्याप्रमाणें स्व-स्वरूपस्वानुभवगम्य सम्यग्ज्ञानमयी स्वभाव वस्तू व वेदनीयकर्म एकमेकांशीं स्पर्श पण करण्यास समर्थ नाहीं.

शंका— स्वामिन्, आतांपर्यन्त आपण वेदनीय कर्माचें स्वरूप समजावून सांगितलें परन्तु तो स्वभाव झाला मग एकाच वस्तूंत स्वभाव व विभाव असें दोन धर्म असतात तें कसें ?

समाधान— वस्तू अनेक धर्मात्मक असते, परन्तु मुख्यतः दोन प्रकारची म्हणजे वास्तविक वस्तूंत प्रकार वगैरे कांहीएक नसतात, आपल्याच दृष्टींत फरक असतो. त्या दृष्टीलाच (विवक्षेलाच) नय म्हणतात. जरी हे नय

अनेक आहेत तरी मुख्य सात त्यालाच सप्तभंगी असें म्हणतात. परंतु त्यामध्येंही मुख्य दोन आहेत. एक व्यवहार व दुसरा निश्चय. ह्यालाच स्याद्वाद ह्मणतात. जी अतत्वदृष्टी तो व्यवहार. जी तत्वदृष्टी तो निश्चयव्यवहार. दृष्टी ही बाह्यदृष्टी आहे आणि निश्चयदृष्टी ही अंतरदृष्टी आहे. दोन्हीचा मतलब समजूनच आपले हित साधावे लागते. दृष्टांत जसें:— आरशांत आपणांस नाना वस्तू दिसतात व आपण त्याप्रमाणें लागलीच व्यवहारांत असें म्हणतोही कीं, तें पहा आरशांत पाणी, तो पहा आरशांत अग्नी किंवा तो पहा मोर परंतु विचार करा कीं, वास्तविक ह्या पैकीं एकही वस्तू आरशांत असते काय ? अर्थात नसते. नसते म्हणावे तर आहे ( दिसते ) असते म्हणावे तर हातीं लागत नाहीं व

दोन्हीं वेगवेगळे दिसतात. परन्तु इतकी खोल विचारशक्ति ज्यांत नाहीं अशा बालकासमोर तो मोर दिसणारा आरसा ठेवला तर तो त्याला धरण्याचा प्रयत्न करतो कीं नाहीं; आणि आपण, आरसा व मोर यांचे परस्पर स्वभावधर्म जाणत असल्यामुळें त्या बालकाप्रमाणें प्रयत्न कराल काय ?

त्याप्रमाणेंच ज्यांची बालिशदृष्टि आहे, अशांना नेहमीं विभावच दिसणार व ज्यांची ज्ञानदृष्टि निश्चयदृष्टि तत्वदृष्टि आहे त्यांना स्वभावच दिसणार. बरोबरच आहे ! हें जग जसें आहे तसेंच सदोदित असणार परन्तु जो ज्या रंगाचा चष्मा चढवील त्याला त्या रंगानें जग दिसेल. तरी काचच रंगीत असतो, जग रंगीत नसतें. चष्म्याशिवाय जग पाहणें जसें शोभनीय आहे तसें चष्म्यानें जग पाहणें शोभनीय नाहीं. आपल्या डोळ्यास चष्मा

चढविणें हें आपल्या विकारीदृष्टीचें द्योतक आहे. "कोणत्याही तऱ्हेचा चष्मा नसणें म्हणजेच खरी निर्विकारी दृष्टि होय.,, अर्थात् कर्म हें पौद्गलपिंड असल्यामुळें जड आहे व तुम्ही स्वतः वेदक म्हणजे ज्ञानी असल्यामुळें साता म्हणजे सुख व असाता म्हणजे दुःखरूप कर्माला वेदन करतां (जाणतां) परन्तु त्याच्याशीं केव्हांही तन्मय होत नाहीं, तथापि तन्मय झाल्यासारखें वाटतें तेंच अज्ञान आहे. हीच ती बालिशवृत्ति. हेंच तें अतत्वज्ञान किंवा अतत्वश्रद्धान.

॥ सवैय्या ॥ ३१ ॥ जैसे काहू चांडाली जुगलपुत्र जणे एक दियो ब्राह्मणकूं । एक राखलियो है ब्राह्मणके गयो सो तो मदिरा मांस त्याग कायो ॥

भावार्थ— एका चांडाळणीला दोन युगल पुत्र झालें. त्यांपैकीं एक तिनें ब्राह्मणाला दिला

व एक स्वतःच्यें घरीं ठेवला. जो ब्राह्मणाला दिला तो सच्चारित्रवान् बनला; व जो चांडाळणीच्या घरीं राहिला तो दुर्वर्तनी बनला. जो ब्राह्मणघरांत पाळला तो स्वतःस ब्राह्मण समजून जगांत प्रतिष्ठित व अभिमानी झाला. व जो चांडाळणीच्या घरांत पाळला तो स्वतःस चांडाळ समजूं लागला व जगांत अपमानित होऊं लागला. त्याप्रमाणें चांडाळ असें जें वेदनीयकर्म त्याचेच हे साता व असाता नामक युगल पुत्र. त्यांपैकीं साता म्हणजे ब्राह्मणपुत्र तो स्वतःस मी सुखी, मी श्रीमान्, मी कर्तबगार असें मानून अभिमानी झाला; व जो असातानामक पुत्र स्वतःस दुःखी, दरिद्री, कष्टी मानून दारोदार दीनपणें भटकूं लागला. एकाच मातेच्या दोघां पुत्रांपैकीं एकाला जग मस्तक नमवूं लागलें आणि त्याच्याच सहोदर बंधुला कोणी जवळ फटकूं पण देईना. तसें

कारण दोघांच्या जातीचा व कुलाचा अज्ञान पणा होय. तद्वत् वेदनीयकर्म हें मूळचें चांडाळ आहे. त्याचींच सुख आणि दुःख ह दोन मुलें आहेत. परन्तु लोक, स्वर्गादि सुखा भासाला डोकें नमवितात व रात्रंदिवस त्याची आराधना करतात, आणि दुःखापासून दूरदू पळतात. परन्तु दोघांचीही खरी ओळख नस त्यामुळें एकाची रात्रंदिवस आराधना करूनहे तो अभिमानामुळें तुमच्या हातीं लागत नाह [ वश होत नाहीं ] व एकाला भिऊन तुम्ह दूर पळतां परन्तु तो असा खंबीर आहे कीं तुमच्या अंतापर्यंत पिच्छा पुरवतो. जर आप णास आपली इच्छा पूर्ण करावयाची असेल तर दोघांचेही जात, कुल, स्वभाव ओळखून असा म्हणजे दोघेही तुमची आज्ञा शिरसावंद्य मानतील अर्थात् खरें सुखी व्हाल.

दृष्टांत २ रा — सोनार सोन्यामोत्याची व तांबें पितळ यांचेही दागिने करतो, परन्तु त्यायोगें तो स्वतःस श्रीमंत किंवा गरीब, मोठा किंवा हलका, सुखी किंवा दुःखी मानीत नसतो किंवा तो त्या दागिन्याशीं तन्मय पण होत नसतो. तो आपला स्वाभाविक उद्योग करीत असतो. त्याप्रमाणें हे शिष्या ! तूं स्वतः आपल्या चैतन्य गुणाला ओळखून अचैतन्यस्वरूपीं असें जें जड वेदनीयकर्म त्याशीं तन्मय होऊं नको. साता असाताच्या योगानें सुखी दुःखी मानूं नको, तर स्वतःला त्या सुखदुःखाचा वेदक ज्ञाता मान.

दोहा—

एक वेदनीय कर्मका, भेद दोय प्रकार ।
धर्मदास क्षुल्लक कहे, साता असाता विचार ॥

इति वेदनीयकर्म चित्रसहित समाप्तः

## अथ मोहनीयकर्म प्रारंभः

दोहा—

परस्वभाव पररूपकूं मानै अपनो थाप ।
ये विकल्प सब छोडकै भये सिद्धगुण आप ॥

भावार्थ— ज्या वस्तूंत स्वाभाविकच जे गुणधर्म नाहींत ते आहेत व जे गुणधर्म अन्य वस्तूंचे ठायीं असतांना त्यांना अन्य वस्तूंचे ठिकाणीं आहेत अशी कल्पना करणें हाच मोह होय. ह्या मोहापासून जे जीव मुक्त झाले ते स्वतः संपूर्ण कर्मापासून मुक्त होतात.

दृष्टांत— जसा दारूच्या निषेंत दारूड्या मातेला किंवा पत्नीला यथार्थ ओळखीत नाहीं. बेभानपणें वाटेल तसें वरळतो, तसा मोहनीय कर्माच्या योगानें जीव आपलें स्वतःचें स्वरूप न जाणतां परस्वरूपांतच रात्रंदिवस गुंतलेला आढळून येतो. म्हणजे मोही जीव स्वतःचे

ठिकाणीं असलेल्या स्वस्वरूपसम्यग्ज्ञानमयी जोतीला न जाणतां पर जें पौद्गलिक तन, मन, वचनादिक ह्यांना किंवा ह्याचे शुभाशुभ व्यवहार क्रियाकर्म व त्यांचेच सुखदुःखात्मक फल मीच आहें. किंवा माझेंच आहेत अशी मिथ्या कल्पना करतो, तोच मोही किंवा भ्रमिष्ट होय. ह्यालाच मिथ्यात्व किंवा असत्यत्व ह्मणतात. निश्चयमोहाचे वचन सांगतों तें ऐका—

हे तन, मन, वचनादिक 'माझेच, आहेत हा एक विकल्प आणि हे माझें नाहींत हा दुसरा विकल्प. किंवा हे माझेच आहेत किंवा हे माझे नाहींत असें जो मानतो तोच "मी,, आहे अशा प्रकारचे विकल्प जे आहेत ते स्वभाव अज्ञानजन्य पौद्गलिक आहेत. जसें काजळ आणि काळेपणा एकतन्मय आहेत त्याप्रमाणें हे विकल्प आणि मोह एकतन्मय आहेत. जे प्राणि ह्या विकल्पाला आणि

स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञानमयी वस्तूला अग्नि व उष्णतेप्रमाणें किंवा सूर्य आणि प्रकाशाप्रमाणें एकच अथवा तन्मय मानतात—समजतात, ते मोही, भ्रमिष्ट, मिथ्यादृष्टी आहेत. सम्यग्दृष्टी ह्या सर्व विकल्पापासून भिन्न किंवा वेगळा असतो.

"मी, तूं, हा आणि तो ,, हे चार विकल्प किंवा ह्या चारींचे खेळ अथवा विलास आहेत तें सर्व द्रव्यकर्म, भावकर्म, नोकर्माशीं तन्मयी किंवा एक समजावें. मोठ्या खेदाची गोष्ट आहे कीं; ह्या कर्मशिरोमणि मोहामुळेंच जीवाला आपलें खरे स्वरूप पटत नाहीं. मोहामुळेंच तत्वज्ञानाकडे लक्ष लागत नाहीं. मोहामुळेंच हितकर वस्तूला अहितकर आणि अहितकराला हितकर मानतो.

# मोहनयि कर्म



मोहनयि कर्म– दारूप्रमाणें मोहनीयकर्म परवस्तूमध्यें मोहित करते परंतु [मो]हित होणारा स्वयं जवि आहे. जेव्हां हा [illegible] पररूप मोहाच्या संस[र्गा]नें सुटून जाईल त्यावेळींच अविकारी अशा स्वस्वरूपांत स्थिर होईल.

जसें:— दारुड्या दारुच्या गुंगीत माता व पत्नीचें नातें जाणीत नसतांना देखील केव्हां केव्हां मातेला माताच किंवा पत्नीला पत्नीच असें संबोधतो, तथापि तें त्याचें संबोधणें सावधान् अथवा निशारहित माणसाप्रमाणें सम्यग् नसते. त्याप्रमाणेंच मोही जीवाला खात्री नसते कीं; मी चैतन्ययुक्त म्हणजे स्वपरप्रकाशक आहे. ह्या त्रैलोक्यांत जें जें म्हणून चैतन्य दिसतें तें माझ्यामुळेंच दिसतें. अमावस्येच्या निबिड अंधकारालाही प्रकाशतो तो मीच आहे. किंबहुना ह्या जगांतील चराचर वस्तूला मीच प्रकाशतो. ( जाणतो ) अर्थात् ज्यांत ज्ञानगुण आहे तोच 'मी, आहे. केव्हां केव्हां मोही जीव देखील त्या दारुड्याप्रमाणें ज्ञानी जनाप्रमाणें बरळतात. परंतु अनुभव किंवा पक्का

निश्चय नसल्यामुळें त्यांचें तें ज्ञान नसून अज्ञानच होय.

कारण तन, मन, धन, वचनादिक अजीव वस्तूमध्यें आणि ज्ञानमयी जीव वस्तूमध्यें अंधःकार आणि सूर्याप्रमाणें नैसर्गिक भेद आहे हें ज्ञान ज्याला अचल-पक्कें झालें तें विचक्षण पुरुष सदोदित "सोऽहं सोऽहं,, च्या रसांत निमग्न होतसाते आपल्या स्वतःच्या स्वरूपाच्या टेकींत राहून मोहकर्मापासून अत्यंत दूर ह्मणजे मोहकर्म माझें नाहीं ( पर वस्तूच्या ठिकाणीं माझेपणाची कल्पना हा भ्रम आहे ) ' भ्रम हा कूप आहे, आणि शुद्ध चेतनासिंधु आमचें रूप आहे ,,

जसा सूर्यांत प्रकाश गुण आहे, तसा हे तत्वज्ञान प्रेमी, तुझ्यांत ज्ञानगुण आहे. हे तूं खाली ठेव. तूं केवलज्ञान आहे आणि हे मोहादिक अज्ञान आहे.

भावार्थः— ज्ञान व अज्ञानाला सूर्य आणि प्रकाश जसा एकच असतो तसा एक मानतो, समजतो, बोलतो त्या तीव्र मोहीला किंवा मिथ्यादृष्टीला ब्रह्मज्ञानाचा उपदेश व्यर्थ आहे.

प्रश्न— मिथ्यादृष्टीलाच सम्यग्ज्ञानाचा उपदेश करावयाचा; मग मिथ्यादृष्टीला ब्रह्मज्ञानाचा उपदेश व्यर्थ ह्मणतात तें कसें ?

समाधान— ठीक ! अज्ञानीलाच ज्ञानी बनविण्याकरितां उपदेश असतो खरा परंतु ज्यांत पात्रता नसते त्याला उपदेश काय उपयोगाचा ?

शंका— पात्र अपात्र कशावरून जाणावें?

समाधान— ती पात्रापात्र जाणण्याची लक्षणें पुष्कळ आहेत. मुख्यतः पात्राच्या ठिकाणीं आसन्नभव्यत्व, गुरुभक्ती, तत्वज्ञानप्रीति, विचक्षणबुद्धि त्याचप्रमाणें तत्वावर

आणि गुरुवचनावर गाढ श्रद्धा व पूर्वापार चालत आलेल्या व्यवहाराचा ज्ञाता असावा.

शंका:— ह्या सर्वगुणापैकीं, कांहीं नसतील तर ?

समाधानः— कांहीं नसतील तर चालतील परन्तु भव्यता आणि गुरुवचनावर श्रद्धा हे दोन गुण तरी अत्यन्त जरूर आहेत. कारण ज्याचें दृष्टींत विकार झाला त्यालाच अंजन उपयोगी परन्तु जो जन्मांध आहे त्याला शाहाणा डॉक्टर किंवा अंजन काय उपयोगी?

शंकाः— मोह म्हणजे काय ?

समाधानः— ज्ञानाला आणि अज्ञानाला, चैतन्याला व जडाला, सूर्य आणि प्रकाश जसा एक आहे तसा एक मानतो समजतो, बोलतो त्यालाच मोह असें म्हणतात.

दृष्टांत जसेंः— एका नदीकिनाऱ्यावर वाहणाऱ्या पाण्याकडे एकाग्रदृष्टी लावून पाहणाऱ्या माणसाला असा भास होतो कीं, मी सुद्धा वाहात आहे. किंवा रेलवेंत प्रवास करणाऱ्या माणसाला रेलवेच्या खिडकींतून बाहेर पाहात असतांना पुष्कळ वेळ पाहतां पाहतां त्याचें मन पाहण्याकडेच पूर्णपणें वेधलें म्हणजे त्याला असें वाटतें कीं, रेलवे स्थिर असून पृथ्वी व झाडेंच धावू लागलीं आहेत, त्याचेच नांव मोह होय. किंवा एका नदींत जलक्रीडा करण्यास दहा जण गेले. त्यानीं खूप जलक्रीडा केली. शेवटीं वर आल्यावर सर्वांची मोजणी करण्याचे ठरलें व त्याप्रमाणें करीत असतांना जो मोजीत होता तो स्वतःची मात्र त्यांत गणणा करीत नसे. तेव्हां त्या गणतींत नऊच भरत असत आणि त्या पाण्यांत इकडे तिकडे दहाव्या

इसमाचा शोध करीत असत याचेच नांव मोह. अर्थात् पुद्गलादिकाला आणि स्वतः सम्यग्ज्ञान-मयी आहे त्याला एकच समजतो तोच मोही होय.

इति मोहनीयकर्म चित्रसहित समाप्त.

## ॥ अथ आयुकर्म प्रारंभः ॥

| | |
|---|---|
| मनुष्य | आयु |
| देव | ,, |
| तिर्यंच | ,, |
| नारक | ,, |

चौपाई—

खंडन मंडन आयुनाश ।
भये सिद्धपरमातम पाश ॥
अचलायुसम अचल अभेद ।
लीन भये निजरूप अखेद ॥

भावार्थ— ज्याप्रमाणें गुन्हेगाराला तुरुंगवास भोगावा लागतो, त्याप्रमाणेंच जीवाला आयुकर्मामुळें मनुष्यायु, देवायु, तिर्यंचायु व नरकायुरूप चतुर्गतींत आपआपल्या शुभाशुभ कर्माप्रमाणें दिवस कंठावे लागतात. आतां अचलायु ह्मणजे स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञानमयी वस्तूचा अनुभव घ्यावा कीं—

दृष्टांत— सर्वव्यापी आकाश जसें घागरीच्या आंत घटाकाराचे बांधलेलें असतें. घागरीच्या बाहेर मठाकाश मठाकाराचें बांधलेलें असतें. त्यांप्रमाणें सर्वव्यापी असा एक ज्ञानगुणमयी जीव देहरूप घागरींत गुंतलेला ( बांधलेला ) आहे. विचार करा ! जसें— घागरीच्या आंत आकाश आहे तें सर्वव्यापि महा आकाशाशिवाय वेगळे नाहीं. तसेंच देहरूप घागरींत ज्ञान आहे तें केवलज्ञानाशिवाय वेगळे नाहीं.

हे शिष्या, तूं स्वतःला केवलज्ञानाशिवाय अलग ( वेगळे ) समजूं नकोस. कारण केवलज्ञानाशिवाय जी जी वस्तु आहे ती सर्व अज्ञान जडरूप आहे. जगांत सर्व खेळ चेतन व अचेतन, ज्ञान व ज्ञेय यांचाच आहे.

हे सज्जन, तूं स्वतः ज्ञानस्वरूपी स्वभावतःच असून मग वेड्यासारखें अज्ञानस्वरूपी कसें मानतोस ?

हे ज्ञानिन्! व्यवहारनयानें तूं मनुष्य, देव, तिर्यंच, नारकी झाल्यासारखा दिसतो. परंतु हे केवलज्ञानरूप सूर्या, ऐक—

निश्चयनयानें पुद्गल मूर्तिक साकार आहे. आणि तूं केवलज्ञानमयी, निराकार, अमूर्तिक स्वभावतःच आहेस. मोठें आश्चर्य वाटतें कीं, मूर्तिकानें अमूर्तिकाला, साकारानें निराकाराला ज्ञेयानें ज्ञानाला व जडानें चैतन्याला कसें बांधलें ?

# आयुकर्म



आयुकर्म– हें कर्म खोड्याप्रमाणें आहे. खोड्यांत रहणाराची स्थिति जशी सादि व सांत आहे, तशी आयुकर्माची समजावी. खोड्यांत अडकल्याच्या अगोदर आणि नंतर जसें मनुष्याचें अस्तित्व आहे त्याप्रमाणें ( विवक्षित ) आयुकर्माच्या अगोदर आणि नंतर आत्म्याला अनादि आणि अनंत जाणून या कर्मापासून सुटून आत्मा नेहमीं एकाच अवस्थेंत राहतो असें जाणावें

असंभवनीय तें कसें संभवनीय झालें ?

हे मुमुक्षू, तूं भ्रमांत पडूं नकोस. पहाण्या जाणण्याचा गुण तुझ्यांतच आहे.—

तूं स्वतः जो बांधला, इतर जे बांधले गेले आणि बांधण्याचें जें कारण द्रव्य, क्षेत्र, काल, भव, भाव वगैरेंनीं सहजच जाणत व पहात आहेस.

दृष्टांत— जसा सूर्याचा प्रकाश सर्व पृथ्वीवर सहज स्वाभाविक पसरतो, तसें हे ज्ञानसूर्या, तूं जो बांधला त्याला व बंधाला आणि बंधाच्या करणाराला स्वाभाविकच जाणतोस. व्यवहारानें किंवा अज्ञानानें तूं बंधयुक्त आहेस ( अशी म्हणण्याची पद्धत आहे) 'जी वस्तु जशी खास नसते परन्तु इतर वस्तूच्या संबंधानें अशी उलटी भाषा बोलण्याची जी एक पद्धत तोच व्यवहार.,

उदाहरण:— जसें तुपाची घागर, सडक चालू आहे, रस्ता लुटला, अग्नी जळतो वगैरे. आतां विचार करा कीं, तुमची घागर कोणी तरी पाहिली आहे काय, सडक चाल तांना कोणास दिसली काय, किंवा अग्नी जळतांना कोणाच्या नजरेस पडला कीं, काय ? कदाचित् कोणी आविषकारक वैज्ञानिक पद्धतीनें उपरोक्त उदाहरणांतील पदार्थांत तसा प्रकार घडवून आणिला परन्तु अमूर्तिकाला मूर्तिकानें बंधांत पाडणें अशक्य. ही गोष्ट त्रिकालाबाधित आहे. " व्यवहार किंवा निश्चय हे दोन मार्ग वस्तु जाणण्याचे आहेत, परन्तु वस्तु मात्र त्या दोन मार्गापासून भिन्न असते. ,, व्यवहार आणि निश्चयापासून सर्वप्रकारें जो भिन्न आहे तोच परमात्मा—सिद्धपरमेष्ठी ज्ञानघन आहे. जसें सूर्यांत अंधःकार नाहीं. तसेंच सम्यग्ज्ञानमयी सूर्यांत

शुभाशुभ आयु नाहीं. मनुष्य, देव, ति-र्यंच, नरक ह्या चार गतीला फक्त ज्ञान जाणत आहे. हाच तो अचलायु किंवा अखंडायु अथवा पंचम गती.

अणखी कांहीं ऐका, जसें एका पोप-टाच्या मादीनें दोन पिल्लीं काढलीं, एका राजानें पाळलें तें सोन्याच्या पिंजऱ्यांत ठेवले व एका भिल्लानें पाळलें ते लोखंडी पिंजऱ्यांत ठेवलें तेव्हां ह्या दोघांच्या सुखदुःखांत कांहीं फरक आहे कीं काय ? दोघेही सारखेंच दुःखी आहेत. तसें आयुकर्मरूप पोपटाच्या मादीनें शुभायु आणि अशुभायुरूप दोन अंडीं घातलीं. त्यांतून दोन पिल्लीं निघालीं. एकाचें नांव देव किंवा मनुष्य व दुसऱ्याचें नांव तिर्यंच किंवा नारकी. एकानें दान, पूजा, व्रत, शील, जप, तपादिक शुभ कर्में केलीं; आणि एकानें पाप, अपराध कुशीलादि वाईट कर्में केलीं ह्मणून

दोघांनाही आपआपल्या कर्मप्रमाणें बंधनें प्राप्त झालीं. वास्तविक शुभ असो कीं, अशुभ असो दोघांचा धर्म एकच. दोन्हींही बंधनेंच होत. सोन्याची बेडी असो कीं लोखंडाची असो, बेडी ती बेडीच. सोन्याचा सूळ असो कीं; लोखंडाचा असो सूळ तो सूळच.

तेव्हां ह्या शुभाशुभापासून सर्वप्रकारें भिन्न जाणणारा फक्त एक निश्चयनयच किंवा अंतर्दृष्टीच आहे. तो नय किंवा ती शुद्ध दृष्टि सद्गुरुशिवाय प्राप्तीचीप्राप्ती असंभव-नीय आहे.

शंकाः— प्राप्तीची प्राप्ति म्हणजे काय ?

समाधानः— जसें दुधांत तूप सर्वव्यापि आहे, परन्तु आपणांस केवळ तूपच हवें असल्यास त्या दुधावर दही, ताक, वगैरे संस्कार करावे लागतात. नंतर जें तूप निघतें तें पुनः दुधांत जसें मिसळत नाहीं तसें सद्गुरुकृपेनें

ज्याची ज्ञानदृष्टि किंवा दिव्यदृष्टि झाली तो पुनः शुभाशुभायुबंधांत पडत नाहीं.

इति आयुकर्मविवर्ण चित्रसहित समाप्त.

## अथ नामकर्मविवर्ण प्रारंभः

चौपाई

तुमारो नाम नहीं है स्वामी ।
नामकरम तुमसे अलगामी ॥
शुद्ध व्यवहारमें नाम अनंता ।
व्यक्तरूप श्रीजिन अरहन्ता ॥ १ ॥

॥ दोहा ॥

जिनपद नहीं शरीरको । जिनपद चेतन माही ।
जिनवर्णन कछु और है । येहू जिनवर्णन नहि ॥

भावार्थः— जसा चित्रकार नानातऱ्हेची व जितकी काळ्या, पिवळ्या, लाल, हिरव्या पांढऱ्या वगैरे रंगाचीं आणि लहानमोठ्या आकाराचीं चित्रें काढतो त्याप्रमाणें व्यवहारांत प्रत्येक व्यक्तीची किंवा वस्तूची वेगवेगळी

ओळख पटावी ह्मणून अलग अलग नामाभिधान दिसून येतें; परन्तु वास्तविक पहातां तीं सर्व नांवें पुद्गलाचींच असतात. त्याप्रमाणें सम्यग्ज्ञानमयी वस्तूला नांव कसलें; परन्तु व्यवहारानें स्वभाववस्तूला 'जीव', असें सार्थक नामाभिधान आहे. जीव हा सदोदित जीवांतच राहणारा आहे. तो अखंड, अविनाशी, चिरंजीव आहे; परंतु जीव जिवंत, अविनाशी, अखंड वगैरे हजारो नांवें जीं आज प्रचलीत दिसतात तीं सर्व परसंगामुळेंच दिसतात. स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञानमयी स्वभाव वस्तूचा अनुभव असा घ्यावा कीं, जसा सूर्यांत प्रकाशगुण स्वाभाविकच आहे, तसा कोणत्या एका वस्तूंत स्वाभाविकच स्वपर जाणण्याची व पहाण्याची शक्ति आहे. विचार करा ! सर्व नाम किंवा अनाम जो जाणतो-पहातो त्याला काय नांव द्यावें? नाम

किंवा अनाम अथवा भाषण किंवा मौन ही दोन्हीं नांमेच आहेत. थोडा ज्जास्त विचार करा ! कोणतीही एक वस्तु आपल्या स्वभावांतच अविचल असते म्हणजे ती दुसऱ्यांत किंवा दुसरी तिच्यांत मिसळत नाहीं. तिच्याशीं तीच तन्मय असते. जसें सुवर्ण स्वतःच्या स्वभावांतच तन्मय किंवा अविचल असते, त्यांचेच जरी कडे, आंगठी वगैरे आभूषणादिकांना अनेक नांवें असतात. तरी सुवर्ण तें सुवर्णच असतें. एकाच वस्तूला जीं अनेक नांवें दिसतात तीं सर्व एकमेक वस्तूच्या अपेक्षेमुळें दिसतात. जसें— एकाच सुवर्णाचीं कडें, कुंडल, आंगठी, कंठी वगैरे आभूषणें आपण बनवितों आणि त्याच्या वेगवेगळया आकारावरून एकाच्या अपेक्षेनें दुसऱ्याला वेगळें नांव देतों; तसें जर केलें नाहीं तर

अनेक वस्तूंतून जी वस्तु आपणांस हवी ती वस्तु नेमकी अचूकशी कशी शोधून काढावी? मुळींच काढतां येणार नाहीं. त्याप्रमाणेंच जीवाच्या अपेक्षेनें अजीव आणि अजी–वाच्या अपेक्षेनें जीव तसेंच ज्ञानाच्या अपेक्षेनें अज्ञान; अशीं परस्परांच्या अपेक्षेमुळें हीं सर्व नांवें आहेत. हाँ! हाँ। हाँ। धन्य धन्य धन्य सर्व तऱ्हेचा पक्षपातरहित, ज्ञानगुणसंपन्न, स्व-स्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञानमयी स्वभाववस्तु स्वाभाविकच जशीच्या तशी, जशी होती त्याचप्रमाणें आहे. तिला अंतर्दृष्टीनें किंवा सम्यग्ज्ञानदृष्टीनें अथवा परमार्थदृष्टीनें पहाल तर न नाम आहे न अनाम आहे. अर्थात् वस्तु आपआपल्या स्वभावांतच स्थिर, अचल, अखंड किंवा टंकोत्कीर्ण आहे. मग त्याला बाह्य व्यवहाराकरितां नांव द्या किंवा नका देऊं; त्यांत आमची, तुमची किंवा त्या वस्तूची

# नामकर्म



नामकर्म– चित्रकार जशीं नाना चित्रें तयार करतो तसेंनामें नाम-कर्म देखील अनेक शरीरादिक बनवितें. म्हणून दिसणाऱ्या अनेक आत्म्या-च्या निज अवस्था न समजतां नामकर्म निमित्तक [illegible].

काहींएक नुकसान नाहीं; परंतु नजर मात्र वस्तुस्वभावाकडे असूं द्या.

नाम आणि जन्म, मरण हे पांच प्रकारच्या शरीराचेच आहेत. श्रीमद् आचार्य पद्मनंदी आपल्या पद्मनंदी पंचविंशति ग्रंथांत ह्मणतात–

दोहा—

नामकर्मकी भावना भावे सुरती संभाल ।
धर्मदास क्षुल्लक कहै मुक्ति होय तत्काल ॥
अपनो आपो देखकै होय आपको आप ।
हो निश्चिंत तिष्टयो रहै किसका करना जाप ॥
नामकर्म करतारको नाम नहीं सुनसार ।
जो कदापि यो नाम है ताको कर्ता निर्धार ॥

इति नामकर्मविवर्ण चित्रसहित समाप्त.

## अथ गोत्रकर्म प्रारंभः

दोहा—

गोत्रादिक सब कर्मकूं त्याग भये जिनराज ।
धर्मदास क्षुल्लक करै वंदन सुखके काज ॥

वचनिका— ज्याप्रमाणें कुंभकार लहान, मोठीं, हलकीं, भारीं, भांडीं घडवितो त्याप्रमाणेंच जीव हा अज्ञानानें उच्च नीच गोत्रांचा कर्ता होतो म्हणजे वास्तविक जीव हा पौद्गलिक कर्मांचा कर्ता केव्हांच होऊं शकत नाहीं. परन्तु स्वभावसम्यग्ज्ञान रहित जीवाभेदज्ञानाच्या अभावामुळें किंवा देहात्मबुद्धीमुळें तो अहंमन्यतेनें स्वतःच स्वतःला हलका, भारी, उच्च, नीच मानतो. त्यामुळेंच ( अज्ञानामुळेंच ) पुन्हा नवीन कर्में बांधतो. कारण पुरुषार्थसिद्धिउपाय ग्रंथांत म्हटलें आहे कीं, " येनांशेन ज्ञानः तेनांशेन बंधनं नास्ति ,, तेव्हां उच्च नीच कुलाचा किंवा जातीचा अभिमान अथवा दीनता, अज्ञानाच्या दृष्टीनें आहे. मातेच्या पक्षाला जाति आणि पित्याच्या पक्षाला कुल म्हणतात. जाति व कुल (गोत्र) हा

भेद फक्त बोलण्यांतच आहे. जसें— जलतरंग ह्मणजे जल आणि तरंग. जल ह्मणजे पाणी व तरंग ह्मणजे पाण्यावर वाऱ्यामुळें उठणाऱ्या लहरी अर्थात् तेंही पाणीच. तसेंच जल आणि तरंग जरी दिसण्यांत दोन दिसतात तरी वास्तविक एकच आहे. अर्थात् तरंग ही पाण्याची वाऱ्यामुळें होणारी नव्हे दिसणारी पर्याय आहे.

शंका— ह्या दृष्टीनें ( डोळयांनीं ) जें असतें तेंच दिसतें.

समाधान— ह्या दृष्टीनें जें असतें तेंच दिसतें असा कांहीं नियम नाहीं. उदाहरणार्थ- उन्हाळ्यांत हरिणांना माळावर पाण्याचें सरोवर दिसतें.

शंका— तर मग डोळयानें जें दिसतें तें खोटेंच म्हणावें कीं काय ?

समाधान— नाहीं.

शंका— मग कसें काय समजावें ?

समाधान— संज्ञी जीवाला दृष्टी दोन प्रकारच्या असतात. एक बाह्यदृष्टी ह्मणजे चर्मचक्षु आणि दुसरी विवेकदृष्टी, अंतर्दृष्टी, तत्वदृष्टी, ज्ञानदृष्टी.

शंका— मग खरी दृष्टी कोणती ?

समाधान— अंतर्दृष्टी, ज्ञानदृष्टी खरी.

शंका -- बाह्यदृष्टी खोटीच ह्मणावी कीं काय ?

समाधान— दोन्हीं दृष्टी ज्याच्या त्याच्या दृष्टीनें खऱ्याच आहेत. उदाहरण— उन्हाळ्यांत हरिणाला माळावर सरोवर दिसतें त्याचप्रमाणें आपणासपण दिसतें कीं नाहीं? दिसतें. परन्तु हरीण जसें पाण्याच्या आशेनें धावून धावून थकते तरी एक नाहीं तर बिचारें पारध्याच्या जाळ्यांत अडकून प्राणास मुकते तरी त्याप्रमाणें आपली केव्हां तरी अशी स्थिति होती कीं काय? उत्तर— नाहीं.

प्रश्न— त्याचें कारण आपली बाह्यदृष्टी कीं, विवेकदृष्टी ?

उत्तर— विवेकदृष्टी.

समाधान— ह्यावरून जगाचा सर्व व्यवहार समजावा. बाह्यदृष्टीला जें दिसतें तेंच अंतर्दृष्टीलांही दिसते, परंतु बाह्यदृष्टीवाला त्याला खरें मानतो व अंतर्दृष्टीवाला त्याला तसें खरें न मानतां भासमान मानतो. अंतरदृष्टीवाला तटस्थ राहून सर्व मजा पहात असतो. तो आपल्या ज्ञानामुळें बाह्यदृष्टि सारखा कर्मरूप जाळ्यांत सांपडत नाहीं.

शंका— मातेच्या पक्षाला जात व पित्याच्या पक्षाला कुल असें ह्मणत असतांना दोहीला एकच कसें म्हणावें.

समाधान— जसें आंब्याच्या झाडाला फळें आंब्याचीच येतात व झाडाची उत्पत्ती पण आंब्यापासूनच असते. आंब्याला जन्म

देणारी माता म्हणजे आंब्याचेंच झाड. बीं म्हणजे पिता पण आंब्याचेंच फळ होय. आतां विचार करा— आंब्याची जात म्हणजे झाड आंब्याचेंच आणि कुल ह्मणजे बीं पण आंब्याचेंच. अर्थात् कुल व जात हीं दोन्हीं एकच आहेत.

जसें:— एकाच प्रकारच्या म्हणजे प्रवाही पदार्थापासून बनलेली खडीसाखर, तुरटी, मीठ, नौसागर आदि अनेक वस्तु पाण्यांत ह्मणजे प्रवाही पदार्थांत टाकतांच जे आपणांस आतां पर्यंत पिंडरूपानें दिसत होतें तें न दिसतां ह्मणजे चर्मचक्षूनें किंवा बाह्यदृष्टीनें न दिसतां आतां रसनेंद्रिय द्वारा पहावें लागतें "जी वस्तु दुसऱ्या वस्तूंत मिसळून बेमालूम होते ती वस्तु त्याचे जातीची असते.„ त्याप्रमाणेंच नीच, उच्च गोत्रकर्म आहे. स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञा-

नमयी स्वभाववस्तूचा स्वानुभव असा घ्यावा कीं—

जसा एखादा कुंभकार मातीचीं लहान, मोठीं भांडीं घडवितो, परंतु तो स्वतः माती, चाक, दंड, लहान, मोठा आकार यांच्याशीं तन्मय होऊन घडवीत नसतो. ( जर कुंभकारच तल्लीन झाला तर मग त्यानें भांडीं कशीं घडावीं ? जर एक वस्तु दुसऱ्या वस्तूंत मिसळून गेली तर प्रत्येक वस्तूचें जें वेगवेगळें कार्य तें अव्याहत अखंड कसें चालावें ? ) कुंभकार तो कुंभकारच असतो व त्याचीं तीं आयतनें पण आयतनस्वरूपाशींच तन्मय असतात. त्याचप्रमाणें चैतन्याचें कार्य पुद्गल, ज्ञानाचें कार्य अज्ञान, जीवाचें कार्य जड कधींही करूं शकत नाहींत. जो तो आपल्या स्वभावाला सोडून परस्वभावाला ग्रहण करीत नसतो.

अशा प्रकारचा विवेक जाग्रत ठेवणें हें भेदज्ञान. ह्याचें नांव सम्यग्ज्ञान.

जसें:— कुंभार स्वतःला आणि चाक, माती, दंड वगैरेंला भिन्न समजतो त्याप्रमाणेंच आपण आपल्या स्वानुभवगम्य स्वपरप्रकाशज्ञान आत्म्याला शरीरादि द्रव्यकर्म; भावकर्म, नोकर्म ह्यांना भिन्न समजावें.

शंका:— भिन्न समजावें ह्मणजे कसें काय करावें ?

समाधान:— त्याचा अनुभव घ्यावा.

शंका:— निराकार, अरूपी वस्तूचा कसा अनुभव घ्यावा ?

समाधान— जसें लांकडावर लांकूड घासल्यानें जोती प्रगट होते, त्याप्रमाणेंच तत्वज्ञानीच्या विचारावर विचार केल्यानें ज्ञानजोती प्रगट होते. त्याचेंच नांव अनुभव.

शंका— अशा ज्ञानाच्या गोष्टी सर्वच चोहोंकडे चालतात. त्या सर्व अनुभविकच कीं काय ?

समाधान— कोण जाणे ! परंतु त्यामध्यें बहुभाग पोपटपंचीच असतो.

शंका— मग आम्हीं ज्ञानाकरितां अभिन्नत्वाचा जाप करावा कीं काय ?

समाधान— नुसत्या जापानें काय होणार? अंतर्दृष्टि जाग्रत ठेवून विचार करावा. नंतर ज्ञान प्रगट होतें.

शंका— ज्ञानानंतर जाप वगैरेची गरज नाहींना ?

समाधान— ज्ञानानंतर जाप कोणीं कोणाचे करावे.

शंका— म्हणजे ?

समाधान— ज्ञान तें ज्ञानच असतें. त्या ज्ञानाचे जाप ज्ञानानें स्वतः कसें करावे,

आणि अज्ञान अशा जड वस्तूनें तरी कसें करावे ? अर्थात् जो ज्याला सदोदित प्रगटच आहे, त्यानें मी प्रगट आहे; किंवा ज्याला जो स्वभावतःच दिसत नाहीं त्यानें ( जड वस्तूनें ) तरी जाप कसें व कशाचे करावे ?

शंका— मग जाप, स्तुती, स्तोत्रें व्यर्थ झाली तर !

समाधान— नाहीं. अपूर्णावस्थेंपर्यंत तुमच्या मनावर अनादीकालापासून देहात्मबुद्धीची किंवा जडत्वाची जीं अनेक पुटें बसलीं आहेत तीं निघून जाईपर्यंत ज्ञानीची सेवा, पूजा, अर्चा, जाप, स्तुती, स्तोत्र वगैरे सर्वांची जरूरी आहे.

जसें:— व्यवहारांत मातीच्या भांड्याचा कर्ता कुंभार आहे परन्तु वास्तविक मातीच्या भांड्याची करणारी मातीच आहे. त्याप्रमाणेंच व्यवहारदृष्टीनें नीचगोत्र, उच्चगोत्र

जीवानें बांधलें असें आपण नेहमीं बोलतो परन्तु खरें पाहिले तर निश्चयानें ज्ञानमयी जीव ज्ञानरूपच कर्म करीत असतो ह्मणज तो आपल्या ज्ञानानें कर्माला व त्याच्या फळाला जाणतो. आणि नीचता किंवा उच्चता ही गोत्रकर्माचेच आत्मज आहेत अर्थात् नीच उच्च गोत्राला गोत्रकर्मच बांधतें. कर्माचा नाश किंवा कर्माचें बंधन हे कर्मच करीत असतें. जसें—— सूर्यांत व अंधःकारांत स्वाभाविक भेद आहे तसा ज्ञानस्वरूपी जीवांत व उच्चनीचगोत्रांत नैसर्गिक भेद आहे. अर्थात् जीवाचा व नीच-उच्चगोत्रकर्माचा कांहीं एक संबंध नाहीं.

॥ इति गोत्रकर्म वर्णन चित्रसहित समाप्तः॥

## ॥ अथ अंतरायकर्म प्रारंभः ॥

| | |
|---|---|
| दान | अंतराय |
| लाभ | ,, |
| भोग | ,, |
| उपभोग | ,, |
| वीर्य | ,, |

दोहा

त्याग ग्रहणसे भिन्न है, सदासुखी भगवान् ॥
धर्मदास क्षुल्लक कहै, स्वानुभव परमान् ॥१॥

भावार्थः— जसेंः— कोणी एक राजा भंडारीला असा हुकुम करतो कीं, ह्याला एक हजार ( १००० ) रुपये द्या परन्तु भंडारी देऊं देत नाहीं. त्याचप्रमाणें आपल्या ठिकाणीं अंतःकरणांत मनरुपी एक राजा आहे तो वारंवार असा हुकूम करतो कीं, माया—ममता सोडून सर्व संग परित्याग

करावा, परन्तु अंतरायकर्मरूप भंडारी ह्या पर पदार्थाला सोडूं देत नाहीं. येथें स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञानमयी स्वभाव वस्तूचा अनुभव असा घ्यावा कीं, जसें सूर्यापासून अंधःकार स्वभावतःच वेगळा आहे. तसेच माझ्या स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञानमयी स्वभाव वस्तूपासून हे तन, मन, धन, वचनादिक व पापपुण्यरूप जग वेगळें आहे. तेव्हां ह्या परपदार्थाला मी सोडूं तरी कसें व ग्रहण तरी कसें करूं. जसें— सूर्यापासून प्रकाश किंवा चंद्रापासून कला वेगळी नाहीं. तसें जर माझ्या स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञानमयीस्वभाववस्तूपासून हे तन, मन, धन, वचन व पापपुण्य वगैरे वेगळें नसतील तर मग त्या अभिन्न प

त्याग तरी कसा करूं;

व अंधःकाराप्रमाणें स्वभ

करावा, परन्तु अंतरायकर्मरूप भंडारी ह्या पर पदार्थाला सोडूं देत नाहीं. येथें स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञानमयी स्वभाव वस्तूचा अनुभव असा घ्यावा कीं, जसें सूर्यापासून अंधःकार स्वभावतःच वेगळा आहे. तसेच माझ्या स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञानमयी स्वभाव वस्तूपासून हे तन, मन, धन, वचनादिक व पापपुण्यरूप जग वेगळें आहे. तेव्हां ह्या परपदार्थाला मी सोडूं तरी कसें व ग्रहण तरी कसें करूं. जसें— सूर्यापासून प्रकाश किंवा चंद्रापासून कला वेगळी नाहीं. तसें जर माझ्या स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञानमयीस्वभाववस्तूंपासून हे तन, मन, धन, वचन व पापपुण्य वगैरे वेगळें नसतील तर मग त्या अभिन्न पदार्थाचा त्याग तरी कसा करूं; आणि जर प्रकाश व अंधःकाराप्रमाणें स्वभावतःच वेगळी अस-

तील तर त्याचे ग्रहण तरी कसें करूं. तात्पर्य चैतन्यापासून अत्यन्त भिन्न अशा अचेतन पदार्थांचा त्याग व ग्रहण तरी कसें करतां येईल.

विचार करा:— राजा भंडारीला हुकूम करतो कीं, "पर पदार्थाला देवून टाक," परन्तु तो असें कांहीं सांगत नसतो कीं, मीं राजा आहे मलाच गरीबाला देवून टाक. त्याप्रमाणें स्वस्वरूपस्वानुभवगम्यसम्यग्ज्ञानमयी स्वभाववस्तुरूप राजा आपल्या स्वतःच्या ज्ञानदर्शनगुणाला देवून टाकण्यास तयार नसतो ह्मणजे पुद्गलादिक जडरूप किंवा अज्ञानमयी होत नाहीं. अथवा स्वभावतःच भिन्न असलेल्या पदार्थांनी एकमेकाचे त्याग ग्रहण तरी कसे करावे. जसें सूर्यांत प्रकाश गुण स्वभावतःच आहे; तसे ज्यावस्तूंत पहाणें जाणणें हा गुण स्वभावतःच आहे, ती

वस्तु फक्त द्रव्यकर्म, भावकर्म आणि नोकर्म ह्या सर्व द्रष्टव्य वस्तूला जाणतें. म्हणजे द्रव्य-कर्म, भावकर्म व नोकर्माला ती ज्ञानघनवस्तु कांहीं तद्रूप होवून करीत नसते. द्रव्य-कर्मादिक वस्तूंत व ज्ञानघन वस्तूंत परस्पर अंधःकार आणि प्रकाशाप्रमाणें स्वभावतःच भेद आहे.

शंकाः— मग हे सर्व एकच असल्या प्रमाणें तरी का वाटतात.

समाधान— ज्ञानाऽज्ञानांत परस्पर स्वभावतःच भेद आहे तो फक्त स्वभावदृष्टी किंवा तत्वज्ञानीच जाणतो. बाह्यदृष्टीवाला किंवा अज्ञानदृष्टिवाला कसें जाणील म्हणजे ज्ञानाज्ञानांत भेद आहे ही आणि नाहीं ही.

शंकाः— तें कसें ?

समाधान— ज्ञान आणि अज्ञान वास्तविक स्वभावतःच सूर्यप्रकाश आणि अंधः—

कार याप्रमाणें भिन्न आहे परन्तु अनादि कालीन मिथ्यात्वकर्मामुळें म्हणजे तत्वार्थश्रद्धान नसल्यामुळें तें ज्ञान व अज्ञान एक वाटूं लागलें ह्याचें कारण अज्ञानच,

शंका— स्वामिन् आपण एकही आहें असें जें म्हणतां तें कसें ?

समाधान— हां ज्ञान आणि अज्ञान एक आहे तें असें आहे. जसे पाणी आणि कमलपुष्प आणि वास, तिळ आणि तेल, तांदुळ आणि भुसकट, म्यान आणि तरवार. त्याचप्रमाणें ज्ञान व ज्ञेय, जड व चेतन एक आहे. ज्ञान आहे म्हणूनच ज्ञेयाला जाणले व ज्ञेय आहे म्हणूनच ज्ञानाची महती राहिली. अर्थात् ज्ञान व ज्ञेय ह्या दोन वस्तु परस्पर सापेक्ष आहेत. हे मुमुक्षु विचार कर कीं, हे द्रव्यकर्म, भावकर्म, आणि नोकर्म स्वभावतःच अज्ञान, जड

आहेत तेव्हां त्याचा कर्ता केवल ज्ञानस्वभावी वस्तु कशी होईल? हाँ! ज्ञानमयी वस्तु फक्त ज्ञानगुणाचीच कर्ती होईल. अर्थात् ज्ञान फक्त ज्ञेयाला जाणील.

शंका— हे स्वामिन्, कर्म करणें व फल भोगणें हे जर जीवाचे स्वभाव नाहींत तर मग कोणाचे? पुद्गल तर जड आहे.

समाधान— समयप्राभृत श्रीमदमृतचंद्राचार्यकृत कलशांत पहा—

यत्तु वस्तु कुरुतेऽन्यवस्तुनः।
किंचनापि परिणामिनः स्वयम्॥
व्यावहारिकदृशैव तन्मतं।
नान्यदस्ति किमपीह निश्चयात्॥

पं. बनारसीदासकृत समयसार नाटक. दोहा—
करमकरै फल भोगवै, जीव अज्ञानी कोई।
यह कथनी व्यवहारकी, वस्तुस्वरूप न होई॥
भावार्थ— अज्ञानी जीवच कर्म करतो व

त्याचें फळ पण अज्ञानी जीवच भोगतो, हें सुद्धां म्हणणें व्यवहाराचें आहे. वास्तविक पदार्थांचें म्हणजे खऱ्या जीवाचें किंवा चैतन्याचे तसें स्वरूप नाहीं.

शंका— स्वामिन् अज्ञानी जीव व ज्ञानी जीव असें जीवाचे दोन भेद का झाले ?

समाधान— अनादि कालीन जीवाला देहात्मबुद्धीच्या संस्कारामुळें कर्मबंध झाल्या प्रमाणें वाटतो त्यालाच अज्ञानी जीव म्हणतात व गुरूपदेशानें देहात्म बुद्धीला विसरून स्वस्वरूपांत लीन होतो तो जीव ज्ञानी. अर्थात देहात्मबुद्धि होणें किंवा ज्ञानरूप बुद्धि होणें हीं दोन्हीं कार्यें संकल्पविकल्पात्मक मनाचीच आहेत म्हणजे मिथ्यात्व किंवा सम्यक्त्व हे दोन भाव मनाचेच आहेत. ज्ञेयापासून ज्ञान भिन्न कसें आहे ते पहा. श्रीमत् स्वामी अमृतचंद्राचार्य समयप्राभतकलशांत म्हणतात—

शुद्धद्रव्यस्वरसभवनात्किं स्वभावस्य शेष-
मन्यद्द्रव्यं भवति यदि वा तस्य किं स्यात् स्वभावः
ज्योत्स्नारूपं स्नपयति भुवं नैव तस्यास्ति भूमि-
र्ज्ञानं ज्ञेयं कलयति सदा ज्ञेयमस्यास्ति नैव ॥

भावार्थ— ज्याप्रमाणें चंद्रकिरण प्रकाशित होऊन सगळ्या भुमंडलाला पांढरे शुभ्र करून सोडते, परंतु स्वतः पृथ्वीरूप होत नाहीं; किंतु प्रकाशरूपच रहाते. त्याचप्रमाणें ज्ञान हेयोपादेयरूप ज्ञेयपदार्थाला प्रकाशित करते ( जाणते ) परंतु ज्ञेयरूप होत नाहीं. शुद्ध वस्तु शुद्ध पर्यायरूपच परिणमन करते आणि स्वतः स्वस्वरूपच रहाते. केव्हांही पररूप होत नाहीं. ही गोष्ट निश्चित आणि अनादिकालीन जिनवाणी सांगत आली आहे.

द्रव्यकर्म, भावकर्म आणि नोकर्म हीं सर्व अज्ञानमय आहेत किंबहुना ज्ञानावरणादि आठ कर्में हीं सर्व पुद्गलद्रव्याचेच परिणाम आहेत.

ह्या सर्वांला ज्ञानमयी आत्मा फक्त जाणतो. जो आत्मा आहे तोच तो ज्ञानपुंज केवलज्ञानरूप आहे, आणि निश्चयानें ज्ञानावरणरूप परिणाम आहेत तें सर्व असें आहेत कीं, जसें गोरसाचे ( दुधाचे ) दही, ताक, तूप, स्वादिष्ट, आंबट, फिक्के वगैरे परिणाम ( परिणमन अर्थात् रूपांतर) आहेत, त्याप्रमाणेंच पुद्गलद्रव्याचेही द्रव्यकर्म, भावकर्म, नोकर्म हे सर्व परिणाम जाणावे. आतां विचार करा कीं—

जसें:— कोणी एक मनुष्य दुधाच्या सर्व परिणामाला जाणतो परन्तु तो कांहीं दही, ताक, तूप, स्वादिष्ट, आंबट व फिके वगैरे परिणामरूप होत नाहीं त्याप्रमाणेंच ज्ञानघन-आत्मा पण पुद्गलद्रव्यें व त्याचे सर्व परिणाम त्याला पहातो जाणतो परन्तु त्याशीं तन्मय होत नाहीं म्हणजे पुद्गलरूप होत नाहीं. अर्थात् ज्ञानावरणादि आठ कर्मांचा

कर्ता भोक्ता नाहीं; परंतु ज्ञाताद्रष्टा आहे.

तात्पर्य— जसें गोरसाच्या शेजारी बसून पहाणारा आपल्या पहाणेंरूप क्रियेंतच तल्लीन किंवा तन्मय होऊन पहातो तसेच पुद्गल परिणामच कारणीभूत आहेत ज्याला असा जो ज्ञानस्वरूप आत्मा तो आपल्या ज्ञानांतच तल्लीन किंवा तन्मय होऊन पहातो श्रीमत् अमृतचन्द्राचार्य समयसारकलशांत सांगतात—

कर्तृत्वं न स्वभावोस्य चित्तो वेदयितृत्ववत् ।
अज्ञानादेव कर्ताऽयं तदभावादकारकः ॥

आणखी पुन्हः सांगतातः—

नास्ति सर्वोऽपि सम्बन्धः परद्रव्यात्मतत्वयोः ।
कर्तृकर्मत्वसम्बन्धाभावे तत्कर्तृता कुतः ॥

भावार्थ— वास्तविक विचार केला असतां या आत्म्याचा खास स्वभाव परम प्रकाशरूप आहे. म्हणूनच ज्यांत लोकालोकांतील

सहाही द्रव्यांच्या अनंत पर्याय झळकत
अर्थात् आत्मा आपल्या ज्ञानगुणाचाच
आहे. परंतु अनादिकालीनअज्ञानामुळें पौद्ग
कर्मांचा कर्ता भासतो. परंतु त्या अज्ञाना
अभावी टंकोत्कीर्ण त्रिकालाबाधीत अक
आहे.

तात्पर्यः— जीवाचे चिन्ह चैतन्य
पुद्गलरूप कर्मांचें चिन्ह अचैतन्य असें जा
घेतलें आणि मग जरी दोन्हीं एकक्षेत्रावग
राहिले तरी काय हरकत आहे. चैतन
केव्हांही अचैतन होत नसते.

इति अंतरायकर्म विवर्ण समाप्त

प्रथम भाग संपूर्ण